काजी नजरुल इस्लाम ( जन्म १८९९ ) हे बंगालचे बंडखोर कवी विसाव्या शतकातील भारताच्या सर्वोत्कृष्ट सर्जनशील कलाकारांपैकी एक समजले जातात. नजरुल हे एक उल्लेखनीय कवी व देशभक्त असून त्यांनी भारताच्या स्वातंत्र्य-संग्रामात खूप हाल सोसले आहेत. या हालअपेष्टांतून जे काव्य निर्माण झाले त्याने कवीला व त्याला परमप्रिय असणाऱ्या उद्दिष्टांना अमरत्व प्राप्त करून दिले आहे.

हा बंडखोर कवी जगाच्या दृष्टीने जिवंत असून नसल्यासारखाच आहे. शारीरिक दृष्ट्या तो जिवंत आहे; आणि आज १९७३ साली आपल्या आयुष्याचे ७४ वे वर्ष तो कंठीत आहे. वयाच्या मानाने तो फारसा म्हाताराही दिसत नाही. परंतु दैवदुर्विलास असा की अदम्य उत्साहाचे नजरुल गेली ३० वर्षे मानसिक आजाराने पीडित आहेत. त्यांच्यावरील भयंकर औदासीन्य आणि अनैच्छिक मौन यांतून त्यांची सुटका होण्याची काहीच चिन्हे दिसत नाहीत. नजरुल यांच्या या शोकपूर्ण मौनामध्येही सामान्य माणसाच्या प्रचलित युगाचा संगीत स्वर घुमत आहे.

श्री गोपाळ हाल्दार यांचे हे पुस्तक म्हणजे ज्यांना नजरुल यांचे काव्य, गद्य व गाणी यांचा त्यांच्या भाषेतुन आस्वाद घेता येत नाही अशा वाचकांना त्यांचा परिचय करून देण्याचा एक प्रयत्न आहे. काजी नजरुल इस्लाम यांचे जीवन व कार्य आजच्या काळाच्या उचित संदर्भात संक्षिप्तपणे विशद करण्याचा या पुस्तकात प्रयत्न करण्यात आला आहे.

**आवरण : सत्यजित राय**

**रेखाचित्र : परिमल गोस्वामी यांच्या सौजन्याने**

**मूल्य :** रु

SAHITYA AKADEMI
REVISED PRICE Rs. 15·00

भारतीय साहित्याचे निर्माते

# काजी नजरुल इस्लाम

लेखक

गोपाळ हालदार

अनुवादक

श्रीपाद जोशी




साहित्य अकादेमी, नवी दिल्ली

# प्रस्तावना

काजी नजरुल इस्लाम यांच्याविषयीची ही छोटी पुस्तिका म्हणजे विसाव्या शतकातील भारताच्या उत्कृष्ट सर्जनशील कलाकारांपैकी एका कलावंताचा वाचकांना परिचय करून देण्याचा एक नम्र प्रयत्न आहे. विशेषतः, ज्या बंगाली भाषेत नजरुल यांनी आपली कविता, गद्य आणि गीते लिहिली आहेत त्या भाषेची ओळख नसलेल्या वाचकांसाठीच प्रामुख्याने हे पुस्तक लिहिले आहे. कलाकार आणि त्याची कलाकृती यासंबंधीचे हे गुणदोष विवेचन करणारे सविस्तर मूल्यमापनही नव्हे अथवा परिपूर्ण चरित्रही नव्हे. काजी नजरुल इस्लाम यांचे जीवन आणि कार्य यांची थोडक्यात ओळख करून देण्याचा हा प्रयत्न आहे. त्यामुळे त्याच्या मर्यादा स्पष्ट आहेत. ज्या काळात ते वावरले त्या काळाच्या संदर्भात सारे विवेचन करण्यात आले आहे. कारण तसे केल्यानेच त्यांच्यातील माणूस आणि कलावंत खऱ्या स्वरूपात व यथोचित पैलूंमध्ये व्यक्त होण्याची शक्यता होती. माझ्या या प्रयत्नात वस्तुनिष्ठ राहण्याची मी खटपट केली आहे. ज्या घटनांविषयी शंका आहेत त्या स्वीकारताना किंवा नाकारताना मी भरपूर काळजी घेतली आहे. नजरुलच्या कलाकृती आणि त्यांनी गाठलेली उंची यांसंबंधी लिहिताना, अशा बाबतीत जेवढी तटस्थता बाळगणे शक्य असते तेवढी मी बाळगली आहे. बिगर बंगाली वाचकांना कवी नजरुल यांचे व्यक्तिमत्त्व आणि बंगाली साहित्यातील व संगीतातील त्यांचे स्थान यांविषयी माहिती देऊन त्यांच्या ज्ञानात भर घालणे हा माझा प्रमुख हेतू राहिला आहे. या पुस्तकाच्या निदान काही वाचकांना, ज्यांना तशी संधी उपलब्ध होईल त्यांना, नजरुलचे साहित्य वाचण्याची प्रेरणा झाली, आणि त्यांनी त्यांच्या कविता व गीते मुळातून वाचून त्यांच्याशी प्रत्यक्ष परिचय करून घेतला तर माझा हा हेतू खऱ्या अर्थाने सिद्ध झाला, असे म्हणता येईल. कारण मुळाची बरोबरी कशानेच होणार नाही अगदी उत्कृष्ट अनुवादही मूळ कलाकृतीची जागा घेऊ शकणार नाही. मग हा तर स्थूल आराखडाच आहे. तो ती जागा कशी घेऊ शकेल !

यथातथ्य अनुवाद देण्याचा आव मी आणलेला नाही. मी अधून-मधून मूळ बंगाली काव्यपंक्ती थोडक्यात उद्धृत केल्या आहेत. त्या ओळींचा भावानुवाद

मी दिला आहे. त्यातून मूळ संहितेचा गर्भितार्थ वाचकांच्या लक्षात यावा, असा प्रयत्न मी केला आहे. कारण मला असे वाटते की, ज्यावेळी वाचकांना एखादी कलाकृती मुळातून वाचता येत नाही, त्यावेळी 'हे सारे विवेचन कशाविषयी चालले आहे', याची थोडी फार कल्पना त्या कलाकृतीचे वर्णन वाचताना आली पाहिजे त्यांची ही जिज्ञासा काही अंशाने तरी पूर्ण व्हावी म्हणून मूळ काव्यपंक्ती नागरी लिपीत दिल्या आहेत.

काजी नजरुल इस्लाम यांच्याविषयी चरित्रात्मक आणि विवेचनात्मक पुस्तके पूर्व आणि पश्चिम बंगालमध्ये मोठ्या संख्येने प्रसिद्ध होत आहेत. त्यांपैकी काही गुणात्मकदृष्ट्या खूपच वरच्या दर्जाची आहेत. परंतु त्यांपैकी बहुतेक सर्व बंगाली भाषेत आहेत. नाही म्हणायला, नॅशनल बुकट्रस्टने प्रसिद्ध केलेले श्री बसुधा चक्रवर्ती यांचे छोटेखानी परंतु सुंदर शब्दचित्र तेवढे इंग्रजीत आहे. यांपैकी अनेक लेखकांचा मी आभारी आहे. त्यांच्यापैकी दोघांचा उल्लेख करणे आवश्यक आहे. ते म्हणजे कॉम्रेड मुझफ्फर अहमद आणि जनाब अझरुद्दीन खान हे होत. वास्तविक घटनांच्या बाबतीत मुझफ्फर अहमद हे सर्वात अधिक विश्वसनीय आहेत, असे मी मानतो; आणि श्री खान यांच्याकडून नजरुलच्या अनेक कृतींची माहिती मला मिळाली. याखेरीज श्री चक्रवर्ती यांच्या वर उल्लेखिलेल्या इंग्रजी पुस्तकाची बंगाली आवृत्तीही उपलब्ध आहे. तिचाही मी उपयोग करून घेतला आहे. त्यांचा आणि नजरुलसंबंधी लिहिणाऱ्या इतर लेखकांचा मी अंतःकरणपूर्वक ऋणी आहे.

या माझ्या छोट्याशा प्रयत्नात अनेक उणिवा आहेत, याची मला जाणीव आहे. साहित्य अकादेमीने हे पुस्तक लिहिण्याचे काम मजवर सोपविल्यानंतर ते पूर्ण करण्यात मजकडून अक्षम्य विलंब झाला; आणि ते तयार झाल्यानंतर त्याची मुद्रणप्रत तयार करण्यातही खूप विलंब झाला; त्याबद्दल मी अत्यंत दिलगीर आहे.

२६ मे १९७२

## अनुक्रम


| | | पृष्ठ |
|---|---|---|
| १. | जन्म आणि प्रारंभिक वर्षे | १ |
| २. | योद्धा आणि लेखक : पहिला उद्रेक | ९ |
| ३. | विद्रोही कवी | २४ |
| ४. | जनतेचा कवी | ४२ |
| ५. | आकाशाचा यात्रेकरू | ५६ |
| ६. | तुटलेल्या पंखांवर | ६५ |
| ७. | नजरुल यांचे प्रतिज्ञापत्र | ७७ |
| | संदर्भ-ग्रंथ-विषयक टीपा | ८४ |

# एक जिवंत दुवा

काजी नजरुल इस्लाम हे जगाच्या दृष्टीने मृतवत् आहेत. आज १९७३ साली, आपल्या वयाच्या चौऱ्याहत्तराव्या वर्षी शारीरिकदृष्ट्या ते जिवंत आहेत. त्यांच्या वयाच्या मानाने ते फारसे म्हातारेही दिसत नाहीत. परंतु दैवाची विचित्र लीला अशी की दुर्दम्य सामर्थ्य असणारा हा 'बंडखोर कवी' गेली वीस वर्षे मानसिकदृष्ट्या भ्रमिष्ट अवस्थेत आहे. त्यांची भारी विमनस्कता आणि अनैच्छिक स्तब्धता यांवर काही उपाय नाही. याच्या उलट, कसलीही जाणीव नसताना, या सर्व कालखंडात जुना-नवा काळ आणि विविध लोक यांमधील एक जिवंत दुवा या नात्याने नजरुल यांचे महत्त्व वाढतच गेले आहे. उदाहरणार्थ बंगालमधील कला आणि साहित्य यांनी एका नव्या युगात प्रवेश केला आहे. तरी देखील त्यांना नजरुल-पासून आजही प्रेरणा मिळते. त्या प्रेरणेमध्ये स्नेहपूर्ण व कृतज्ञतापूर्ण कौतुक असते. बंगाली लोक, नजरुलचे लोक, दोन सार्वभौम राष्ट्रांमध्ये राजकीयदृष्ट्या विभागले गेले आहेत. परंतु नजरुलच्या वाणीला, आणि त्या वाणीला प्राणवान् बनविणाऱ्या चैतन्याला 'सीमा' नाहीत, याची त्यांना जाणीव आहे. आपण एका आध्यत्मिक राष्ट्रकुलाचे नागरिक आहोत; आणि या दोन राष्ट्रांमध्ये नजरुल व त्यांचे सर्जनशील सहकारी यांचेच आत्मिक अधिराज्य आहे, अशी त्यांची भावना आहे. अशा प्रकारे आपल्या शोकपूर्ण मौनामध्येही काजी नजरुल इस्लाम हे सामान्य माणसाचा युगप्रवर्तक आवाज बनून राहिले आहेत; आणि जगभरच्या बंगाली लोकांच्या सांस्कृतिक व आत्मिक जीवनामध्ये ते समाईक वारसा बनले आहेत.

## प्रकरण : पहिले

# जन्म आणि प्रारंभिक वर्षे

काजी नजरुल इस्लाम यांचा जन्म अखंड बंगालच्या वर्धमान जिल्ह्याच्या असनसोल उपविभागातील चुरुलिया या गावी २५ मे १८९९ (११ ज्येष्ठ, १३०६ बंगाब्द) रोजी एका गरीब मुसलमान कुटुंबात झाला. त्यांचे पूर्वज मुसलमानी रियासतीत काजी म्हणून पाटण्याहून या खेड्यात आले होते, असे म्हणतात. परंतु नजरुल यांच्या जन्मापर्यंत या कुटुंबाचे सारे वैभव—जहागीर, जमीनजुमला आणि जो काही प्रभाव कधीकाळी असेल तो, हे सारे—नाहीसे झाले होते. उरले होते फक्त 'काजी' हे बिरुद. नजरुल यांचे वडील काजी फकीर अहमद गरीब होते. त्यांना तीन मुली आणि एक मुलगा. त्यांपैकी नजरुल हे दुसरे. नजरुल यांच्या जन्मापूर्वी त्यांच्या पित्याला आप्तस्वकीयांच्या वियोगाचे खूप दुःख सोसावे लागले होते. म्हणून या मुलाचे घरगुती नाव त्यांनी 'दुखु' असे ठेवले. लहानपणी ते याच नावाने घरी-दारी ओळखले जात. दुखूच्या आठव्या वर्षी त्याचे वडील वारले. परंतु त्याच्या अंतःकरणात एवढा आनंद आणि हास्य भरलेले होते की पित्याच्या निधनाचे दुःख फार काळ टिकले नाही. नजरुल यांच्या जन्मकाळी त्यांचे 'ताराख्यापा' असेही एक नाव ठेवण्यात आले होते, असे म्हणतात. कारण त्यांच्या आईने ताराख्यापा नावाच्या एका तांत्रिक संताला आपल्याला मुलगा व्हावा म्हणून नवस केला होता. बीरभूम या ठिकाणी या संताच्या नावाने तारपीठ नावाचा एक मठ आहे. आईचा नवस पूर्ण झाल्यामुळे तिने आपल्या मुलाचे नाव ताराख्यापा असे ठेवले. ते कसेही असो, या घटनेवरून एवढे दिसून येते की नजरुलची माता आणि तिचे कौटुंबिक वातावरण यामध्ये तांत्रिक मार्गावर श्रद्धा होती.

चुरुलिया गावी नेहमीची शाळा नव्हती. फक्त एक मक्तब (विद्यालय) होते. मक्तब म्हणजे प्रारंभिक फारसी व अरबी भाषांचे शिक्षण देणारी पाठशाळा. या पाठशाळेचे दयाळू मौलवी काजी फज्ले अहमद यांच्याकडून नजरुल यांनी फारसी व अरबी भाषांचे बरेच शिक्षण घेतले. त्यांच्या वयाच्या मानाने ते पुष्कळच म्हटले

पाहिजे. कारण ते हुशार होते. वयाच्या दहाव्या वर्षी या मक्तबमधून नजरुल निम्न प्राथमिक (लोअर-प्रायमरी) परीक्षा उत्तीर्ण झाले. एवढेच नव्हे तर या शाळेत त्यांनी एक वर्षभर सहाय्यक शिक्षक म्हणूनही काम केले. सर्वसामान्य ग्रामीण मुलांप्रमाणे नजरुल हे स्वभावतःच धार्मिक वृत्तीचे व धर्मनिष्ठ मुसलमान होते. त्या काळात प्रचलित असल्याप्रमाणे ते स्वाभाविकपणेच बंगाली रामायण, महाभारत व इतर हिंदू पुराणकाव्ये वाचीत व त्यापासून आनंद घेत. तितक्याच भक्तिभावाने ते जवळ-पासचे हाजी पहलवान यांसारखे फकीर, साधू, बाउल, सूफी व दरवेश त्यांच्या संगतीतही वेळ घालवीत. त्यांच्यातील धार्मिक प्रवृत्ती ही तशी स्वाभाविकच म्हणता येईल; परंतु भौतिक सुखाच्या बाबतीतील त्यांची बेफिकिरी मात्र नक्कीच लक्षणीय होती. खरे म्हणजे आपल्या भौतिक गोष्टींची काळजी घ्यायला नजरुल कधी शिकलेच नाहीत. काही बाबतीत तर ते अगदी निष्काळजी, उधळ्येच होते; परंतु वस्तुतः ते 'ख्यापा' ही होते. ख्यापा म्हणजे विक्षिप्त, माथेफिरू, उन्मुक्त किंवा कलंदर. तथापि ते आनंदी, खुशालचेंडू होते; आणि बालसुलभ खोड्या करणे व लोकगीते गाणे हे त्यांचे आवडीचे विषय होते. त्यांना खेड्यातील नाटकमंडळ्यां-लेटो-चे भलतेच आकर्षण वाटे. (व्युत्पत्तीदृष्ट्या नाटक या शब्दा-पासूनच 'लेटो' हा शब्द बनला आहे.) याचे कारण बहुधा हे असावे की, त्यांना रीतसर शिक्षण घेता आले नव्हते. आसपासच्या खेड्यांमध्ये ग्रामीण लोकांच्या संगीत मंडळ्या असत. त्यांना लेटोर दल असे म्हणत. (महाराष्ट्रातील कलगी-तुरा तमाशांप्रमाणे). बंगालमध्ये तरजा व कविर दल (कवि-मंडळी) हे विशेष प्रख्यात आहेत. त्यांच्याच सारखी ही लेटोर दले असत. ती एकमेकांशी संगीतातून व सवाल-जबाबातून 'वाग्युद्ध' करीत. अशा या लेटो मंडळ्यांपैकी प्रत्येक मंडळीमध्ये या कामासाठी नुसते गाणारेच असत असे नव्हे तर काव्यामध्ये खटकेबाज सवाल-जबाब तयार करून देणारा एक शीघ्रकवीही असे. त्याला 'गोडाकवी' असे म्हणत. प्रतिपक्षाने सामन्याच्यावेळी टाकलेल्या सवालाला जागच्या जागी ताबडतोब काव्यातून जबाब देण्यासाठी त्याला 'कवने' रचावी लागत. नजरुल यांच्या काकांपैकी एकजण एका ग्रामीण लेटोर दलामध्ये काम करीत होता. त्याने आपल्या या पुतण्याला त्या दलात प्रवेश मिळवून दिला. अशा प्रकारे नजरुल हे वयाच्या चौदाव्या वर्षीच एका दलाचे पुढारी बनले. या काळातील नजरुल यांची काही लेटो-गीते जतन करण्यात आली आहेत. (पाहा : अझरुद्दीन खान 'बंग साहित्ये नजरुल,' १३६३ बंगाब्द, पृ. ६–८) या गीतावरून लोकसाहित्य आणि लोकजीवन यांमध्ये नजरुलची पाळेमुळे किती खोलवर जाऊन पोचलेली होती ते दिसून येते. एवढेच नव्हे तर त्यांच्यातील विषयांचे अद्भुत वैविध्य, आणि बंगाली लय व सूर यांवरील त्यांची सहजसाध्य पकड यांचीही त्यांवरून कल्पना येते. याचा अर्थ असा की नंतरच्या काळात नजरुल

यांनी जी भावगीते लिहिली ती काही परकी निर्मिती नव्हती. परंतु लेटो मंडळ्यांचे कार्यक्रम ठराविक मोसमांतच होत असत; आणि एखाद्या वर्षी पीक-पाणी वाईट झाले की या मंडळ्यांना वाईट दिवस येत. नजरुल यांच्या नशिबीही असे वाईट दिवस येत.

तेव्हा मग नजरुल आपले गाव सोडून असनसोल या शहरी आले. ते एक मोठे रेल्वे जंक्शन असून कोळशाच्या खाणीचेही केंद्र आहे. नजरुल यांनी प्रथम एका रेल्वे गार्डाच्या घरी घरगडी म्हणून काम केले; परंतु लौकरच त्यांनी एका पावरोटीवाल्याकडे उमेदवार म्हणून काम करण्यास सुरुवात केली. या कामातून फुरसत मिळाली की ते त्या दुकानात बसून गाणी गात व बासरी वाजवीत. त्या तरतरीत तरुणाची गाणी व बासरी ऐकण्यास लोक गोळा होऊ लागले. त्या लोकांमध्ये श्री. रफीझुल्ला नावाचा एक पोलिस सबइन्स्पेक्टरही होता. त्या मुलाच्या हुशारीने तो खूपच प्रभावित झाला. त्याने नजरुल यांना सध्या बांगला देशात असलेल्या मैमनसिंग जिल्ह्यातील आपल्या खेडेगावी नेले; आणि जवळच्या दरिया-रामपूर हायस्कूलमध्ये निःशुल्क विद्यार्थी म्हणून त्यांचा प्रवेश करवून दिला. (१९१२ ?) तरीपण नजरुल यांचे मन रस्त्याच्या कडेला असणाऱ्या शेतांमध्ये राबणाऱ्या शेतकऱ्यांच्या मुलांमध्येच अधिक रमू लागले. त्यांच्याबरोबर खेळावयाचे, त्यांच्यात बसून हुक्का ओढायचा, त्यांच्याबरोबर मासेमारी करावयाची आणि अर्थातच आपल्या शीघ्रकवित्वाने त्यांचे मनोरंजन करावयाचे हा त्यांचा छंद बनला. शाळेच्या वार्षिक परीक्षेत या तरुण विद्यार्थ्याने बंगाली साहित्याच्या प्रश्नपत्राचे उत्तर स्वतः तयार केलेल्या काव्यातून लिहिले होते अशी एक दंतकथा सांगितली जाते. परंतु इतर विषयांच्या बाबतीत तशी संधी नसल्यामुळे नजरुल यांना त्या प्रश्नांची उत्तरे लिहिता आली नाहीत. ते नापास झाले. ते काहीही असो. ते असनसोलला परत आले. याबाबतीत अधिक शक्यता अशी दिसते की रीतसर शालेय शिक्षण घेण्याची त्यांची इच्छा असली तरी त्यासाठी लागणारा पैसा त्यांच्याजवळ नसल्यामुळे त्यांना शिक्षण सोडावे लागले.

ते असनसोलला परत आल्यानंतर माथून येथील हायस्कूलमध्ये त्यांना प्रवेश मिळाला. कविवर्य कुमुदरंजन मल्लिक हे त्यावेळी त्या शाळेचे मुख्याध्यापक होते. कासिमबाजार (मुर्शिदाबाद)चे लोकहितैषी जमीनदार महाराजा मणींद्रचंद्र नंदी हे ते विद्यालय चालवीत होते. तेथे आपल्याला निःशुल्क शिक्षण आणि इतर सवलती मिळतील अशी नजरुल यांना आशा वाटत होती. पण ती सफळ झाली नाही. मग त्यांना सियरसोल संस्थानातील राणीगंज (बरद्वान) येथील सियरसोल हायस्कूलमध्ये प्रवेश मिळवावा लागला. सियरसोल हे एक जुन्या पद्धतीचे सरंजामशाही संस्थान होते. तेथे त्यांना सहजासहजी नादारी मिळाली. तेथील मुस्लिम छात्रालयात त्यांची मोफत राहण्या-जेवण्याची सोय झाली;

आणि वर दरमहा ७ रुपयांची शिष्यवृत्तीही मिळाली. त्यावेळी ते आठवीच्या वर्गात शिकत होते. ते अत्यंत बुद्धिमान होते. त्यांनी मनात आणले तर ते वर्गात पहिलेही येत. त्याप्रमाणे ते आपल्या हुशारीमुळे सर्वप्रथम आले. त्यामुळे वर्षाच्या अखेरीस त्यांना एक वर्ष गाळण्याची संधी देण्यात आली. त्यांना आठवीतून एकदम दहावीत प्रवेश मिळाला. त्याकाळी दहावी हे शाळेतील शेवटचे वर्ष असे. राणीगंज या छोट्या शहरात त्यांचे जे इतर समकालीन त्यावेळी होते त्यांमध्ये बंगालचे प्रख्यात कादंबरीकार व कथालेखक शैलजानंद मुखोपाध्याय हे एक होते. पण ते दुसऱ्या शाळेत होते. त्या दोघांमध्ये साहित्यप्रेम हा समान आवडीचा विषय असल्याने त्यांच्यांत साहित्यिक मैत्री निर्माण झाली व ती शेवटपर्यंत टिकली. आश्चर्याची गोष्ट अशी की त्या काळात नजरुल प्रामुख्याने गद्यसाहित्य लिहीत तर शैलजानंद पद्यरचना करीत. नंतरच्या काळात मात्र त्यांच्या या भूमिकांची आलटापालट झाली.*

परंतु याच वेळी नजरुल यांच्या जीवनावर इतरही प्रभाव पडू लागले. त्यांच्या शाळेत निवारणचंद्र घटक हे एक शिक्षक होते. 'युगांतर' या नावाच्या एका गुप्त क्रांतिकारी संस्थेचे ते सभासद होते. या संदर्भात उल्लेख करण्यासारखी गोष्ट अशी की श्री. घटक यांच्या आत्या दुकारी देवी या बंगालमधील क्रांतिकारकांच्या संघटनेत काम करणाऱ्या स्त्रियांपैकी दारूगोळा व हत्यारे जवळ बाळगण्याबद्दल तुरुंगवासाची शिक्षा झालेल्या पहिल्या महिला होत. परंतु आपल्या प्रस्तुत विवेचनाच्या दृष्टीने अधिक महत्त्वाची गोष्ट अशी की श्री. घटक यांनी नजरुलमधील ओज व जीवनानंद पारखला आणि त्यांना आपल्या जवळ ओढून घेतले. ते पहिल्या महायुद्धाचे (१९१४–१९१८) दिवस होते. भारतीय क्रांतिकारकांच्या दृष्टीने स्वातंत्र्यासाठी हल्ले चढविण्याची ती घाईगर्दीची वेळ होती. ब्रिटनवरील विपत्ती ही त्यांच्या दृष्टीने सुवर्णसंधी होती. त्या निर्वाणीच्या क्षणी ब्रिटिश राज्यकर्त्यांनाही भारतातून युद्धाच्या वेदीवर बळी देण्यासाठी सैनिकरूपी बकरे (किंवा शत्रूंच्या तोफांसाठी खाद्य) हवे होते. ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या परिभाषेत बंगाली ही भारतातील एक 'बिगर लढाऊ जमात' होती आणि तोपर्यंत बंगाल्यांना सैन्यात प्रवेश करण्यास बंदी होती. आता 'एक प्रयोग म्हणून' राज्यकर्त्यांनी बंगाल्यांची एक 'डबल कंपनी' उभारण्याचे ठरविले. नंतर या कंपनीला '४९ वी बंगाली रेजिमेंट' असे नाव देण्यात आले.

---

* श्री. शैलजानंद मुखोपाध्याय यांनी १९७० साली 'रिकलेक्शन्स अबाउट नजरुल' (नजरुल यांची संस्मरणे) हे पुस्तक लिहिले. नजरुल विषयक जे साहित्य दोन्ही बंगालमध्ये मोठ्या प्रमाणावर प्रकाशित होत आहे, त्यामध्ये या पुस्तकाने स्वागतार्ह भर घातली आहे.

त्यावेळी नजरुल फक्त १८ वर्षांचे होते. त्यांनी सैन्यात भरती होण्याची ती संधी घ्यावी, आणि स्वातंत्र्ययुद्ध यशस्वी होण्यासाठी अत्यंत आवश्यक असणारे खूप दिवस इच्छिलेले असे लष्करी प्रशिक्षण मिळवावे, म्हणून त्यांना प्रोत्साहन दिले गेले. बहुधा नजरुल यांना फारसे उत्तेजन देण्याची गरजच भासली नसावी. त्यांच्या अंगी असणारे स्वातंत्र्यप्रेमच पुरेसे झाले असावे. तरीपण निवारण घटक यांनी त्या स्वातंत्र्यप्रेमाला दिशा दाखविण्याच्या बाबतीत मदत केली; आणि देशाचे स्वातंत्र्य हे निश्चित उद्दिष्ट त्यांच्यासमोर ठेवले, यात शंका नाही. ती कायमची प्रेरणा बनली. काळाबरोबर तिचा अर्थ व्यापक बनत गेला. नजरुल यांच्या बहुमुखी प्रतिभेच्या सर्जनशीलतेच्या त्या परमोच्च कालखंडामध्ये तिच्यावर क्रांतिकारक देशभक्ती आणि स्वातंत्र्याची अभिलाषा यांचा खोल ठसा उमटला. कोणाही महत्त्वपूर्ण कलावंताच्या बाबतीत आपल्या काळाशी बांधीलकी न स्वीकारणे ही गोष्ट अवघडच असते. जेव्हा स्वातंत्र्ययुद्ध सुरू असते तेव्हा त्याच्यापासून अलिप्त राहाणे हे कोणाही महत्त्वाच्या पराधीन लेखकाच्या बाबतीत अनैसर्गिक किंवा अस्वाभाविक असते. निदान नजरुल तरी सियरसोलमध्ये असल्यापासून कोणत्याही परिस्थितीत स्वातंत्र्याशी 'बांधील' होते. आणि म्हणून एक कवी व कलावंत या नात्याने काजी नजरुल इस्लाम यांचे जीवन व विकास हे त्यानंतरच्या वीस-पंचवीस वर्षांपर्यंत–किंबहुना त्यांचे सर्जनशील जीवन समाप्त होईपर्यंत–घडलेल्या राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय घटनांच्या संदर्भातच योग्य प्रकारे समजून घेता येईल.

अशा प्रकारे १९१७ साली नजरुल यांनी शालेय अभ्यासक्रमाच्या शेवटच्या वर्षी शिक्षणाला रामराम ठोकला, आणि ते 'डबल कंपनी'त भरती झाले. त्यांना ताबडतोब नौशेरा ( वायव्य सरहद्द प्रांत ) येथे पाठविण्यात आले; आणि तेथून ते आपल्या पलटणीबरोबर कराचीला गेले. तेथे ते १९१७ पासून १९१९ पर्यंत राहिले. १९१९ साली युद्ध समाप्त झाल्यावर त्यांच्या बंगाली रेजिमेंटचे विसर्जन करण्यात आले. नजरुल हे साध्या शिपायापासून चढत-चढत हविलदार ( नॉन कमिशंड ऑफिसर ) या हुद्यापर्यंत जाऊन पोचले. वस्तुतः ते क्वार्टर मास्टर म्हणून काम करीत होते. त्यांचा मनमोकळा स्वभाव आणि प्रेमळ सहवास व त्यांच्या कवितांपेक्षाही अधिक मोहक अशी त्यांची गाणी यामुळे कराचीच्या लष्करी बराकीतील आपल्या सर्व सैनिक सहकाऱ्यांमध्ये ते चैतन्याचा स्रोत बनले. त्यांच्या पलटणीशी संबद्ध असलेल्या एका पंजाबी मौलवीसाहेबांच्या मदतीने नजरुल यांनी फारसी भाषा व फारसी काव्य यांविषयीच्या आपल्या ज्ञानात भर घातली. ज्या-ज्या वेळी स्फूर्ती येई त्या-त्या वेळी ते गद्य, पद्य व गाणी लिहीत असत. या व इतर लेखनांबरोबरच त्यांनी हाफिजच्या रुबायांचा बंगाली अनुवाद करण्यास सुरुवात केली. मात्र ते काम पूर्ण होऊन प्रसिद्ध

होण्यास बराच काळ लागला. १९३० साली (१३३७ बंगाब्द) तो अनुवाद प्रसिद्ध झाला.

या सुमारास नजरुल यांची 'बाउंडुलेर आत्मकथा' (एका कलंदराची आत्मकथा) ही लघुकथा कलकत्त्याहून मौलवी नासिरुद्दीन यांच्या संपादकत्वाखाली प्रकाशित होणाऱ्या 'सौगात' या नियतकालिकाच्या ज्येष्ठ १३२६ (१९१९) च्या अंकात प्रसिद्ध झाली. ती त्यांची प्रकाशित झालेली पहिलीच लघुकथा होती, असे म्हणतात. त्यांच्या स्वतःच्या जीवनाशी या कथेचा थोडाफार संबंध होता. 'सौगात' ला साहित्यिक क्षेत्रात चांगली प्रतिष्ठा होती. परंतु जवळ-जवळ याच सुमारास बंगीय मुसलमान साहित्य समितीचे मुखपत्र असलेल्या 'बंगीय मुसलमान साहित्य पत्रिका' या त्रैमासिकाच्या श्रावण १३२६ (जुलै–ऑगस्ट १९१९) च्या अंकात त्यांची 'मुक्ती' या शीर्षकाची एक आख्यानात्मक कविता प्रसिद्ध झाली. (या कवितेला कवीने 'क्षमा' हे शीर्षक दिले होते. परंतु संपादकांनी ते बदलून 'मुक्ती' असे केले. पुढे कवीनेही या बदलाला मान्यता दिली.) ही नजरुल यांची प्रकाशित झालेली पहिलीच कविता होय. ही कविताही सत्य घटनांवर आधारलेली होती आणि राणीगंजमधील एका कोपऱ्याचे त्यात आलेले वर्णन लक्षात राहण्याइतके उठावदार बनलेले आहे. एका फकिराचे जीवन आणि मरण यांसंबंधीची ती कथा असून त्या फकिराच्या कृपेमुळे एका झाडाला नवी पालवी फुटल्याचा दैवी चमत्कार तिच्यात वर्णन केला आहे. ती कविता मनोहर यमकांनी युक्त असून तिचा प्रसादगुण वाखाणण्यासारखा होता. अनेक दृष्टींनी ती वैशिष्ट्यपूर्ण होती. नजरुल यांची लहानपणापासूनच चमत्कारांवर आणि धार्मिक गूढ शक्तींवर प्रच्छन्न श्रद्धा असल्याचे तिच्यावरून दिसून येते. कराचीहून पाठविलेल्या या कवितेमुळे त्यांचा पुनः एकदा कॉम्रेड मुजफ्फर अहमद यांच्याशी संपर्क प्रस्थापित झाला. श्री. मुजफ्फर अहमद हे प्रख्यात साम्यवादी पुढारी होते. वस्तुतः ते काही त्या पत्रिकेचे औपचारिक दृष्ट्या संपादक नव्हते; परंतु पत्रिका व समिती यांचे ते प्राण किंवा आधारस्तंभ होते. त्यांचा नजरुलशी त्यापूर्वीच पत्रव्यवहाराच्या द्वारे संबंध प्रस्थापित झालेला होता, हे उघड आहे. त्यांची दृष्टी मोठी विवेचक होती. वरील आख्यानात्मक कविता वाचल्यानंतर साहित्याकाशात एका धूमकेतूचा उदय झाल्याचे त्यांना जाणवले. त्यामुळे बंगीय मुसलमान साहित्य पत्रिकेच्या वतीने कराचीला असलेल्या त्या कवीशी संपर्क साधण्यात त्यांनी मुळीच विलंब लावला नाही. त्यांनी नजरुल यांना आणखी साहित्य पाठविण्याचा आग्रह केला. अशा प्रकारे त्या दोघांमधील भरीव व वैशिष्ट्यपूर्ण मैत्रीचा पाया घातला गेला. कालांतराने नजरुल हे भारतातील नसले तरी बंगालमधील साम्यवादी विचारसरणीशी बांधीलकी असणारे कवी म्हणून मान्यता पावले. त्यांच्या या विकासात मुजफ्फर

अहमद् यांच्याशी झालेल्या त्यांच्या मैत्रीला फार महत्त्वाचे स्थान होते.* त्यावेळी बं. मु. सा. प. हे नजरुल यांच्या दृष्टीने अभिव्यक्तीचे प्रमुख्य माध्यम बनले. 'हेना' आणि 'व्यथार दान' या त्यांच्या दोन लघुकथा पत्रिकेच्या लागोपाठच्या दोन अंकात (ऑगस्ट १९१९) प्रसिद्ध झाल्या. त्यांपैकी 'व्यथार दान' (व्यथेचे दान) ही कथा अधिक वैशिष्टयपूर्ण होती. या कथांमुळे ते सर्वसामान्य वाचकांमध्ये आणि विशेषतः समितीच्या तरुण सुशिक्षित मुसलमानांमध्ये चांगलेच लोकप्रिय झाले. मौलवी काजी अब्दुल वदूद आणि अबुल कलाम शम्सुद्दीन यांच्यासारखे जे लेखक पुढील काळात प्रख्यात साहित्यिक म्हणून गाजले त्यांच्याशी नजरुलची मैत्री जमली. नजरुल यांनी हाफिझच्या रुबाइयांचा केलेला अनुवादही याच सुमारास 'प्रवासी' या बंगालीतील अग्रेसर साहित्यिक मासिकात प्रकाशित झाला. (पौष, १३२६; डिसेंबर १९१९). त्यांचा हा अनुवाद पवित्र गांगुली यांनी 'प्रवासी'कडे प्रकाशनार्थ पाठविला होता. त्यातून नजरुल व पवित्र गांगुली यांच्या चिरस्थायी मैत्रीचा पाया घातला गेला. या घटनेचाही या अनुषंगाने उल्लेख केला पाहिजे.

१९२० सालच्या प्रारंभी नजरुल यांची पलटण विसर्जित करण्यात आली. तत्पूर्वी जानेवारीमध्ये ते एक आठवड्याच्या रजेवर कलकत्त्याला व चुरुलियाला आले होते. कलकत्त्यामध्ये त्यांना मुजफ्फर अहमद् भेटले. त्यांची ही पहिलीच भेट होती. सैन्यातून निवृत्त झाल्यावर नजरुल यांनी साहित्यसेवेला वाहून घ्यावे, असा मुजफ्फर साहेबांनी त्यांना आग्रह केला. मार्च १९२० मध्ये नजरुलची पलटण प्रत्यक्षपणे बरखास्त करण्यात आली, आणि नजरुल कायम स्वरूपात बंगालला परतले. ते प्रथम आपल्या आईला भेटण्यासाठी आपल्या गावी गेले. परंतु तेथे फार काळ न राहता ते लागलीच कलकत्त्याला परतले. तेथे त्यांचे मित्र शैलजानंद यांनी त्यांचे स्वागत केले. वस्तुतः ते ३२, कॉलेज स्ट्रीट या घराच्या पहिल्या मजल्यावर मुजफ्फर अहमद् यांच्याबरोबर राहू लागले. 'मुस्लिम भारत' व 'मुसलमान साहित्य समिती' यांच्या कचेऱ्या याच जागेत होत्या; आणि त्यांचे संघटक मुजफ्फर अहमद्, अफझल-उल-इस्लाम, काजी अब्दुल वदूद आणि इतर काही मंडळीही तेथेच राहात होती. 'नंबर ३२' हे त्यावेळी त्यांच्या जीवनाचे केंद्रच होते. नजरुलनी त्यांच्याशी गट्टी केली. माजी सैनिक या नात्याने नजरुल यांना नोकरी मिळण्याची चांगलीच संधी होती; आणि त्याप्रमाणे सरकारच्या महसूल खात्यात सबरजिस्ट्रारच्या जागेसाठी त्यांना मुलाखतीचे बोलावणेही

* मुजफ्फर अहमद यांच्या 'काजी नजरुल इस्लाम–रेमिनिसन्सेस' (१९६७–६९) या पुस्तकामुळे विसाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकातील व चौथ्या दशकाच्या अखेरीच्या काळातील नजरुल यांच्या जीवनाशी संबंधित काही प्रश्न व घटना यांवर प्रकाश टाकण्याच्या कामी खूपच मदत होते.

आले. परंतु ते तर स्वातंत्र्यप्राप्तीसाठी प्रेरित होऊन देशभक्तीच्या भावनेने १९१७ साली सैन्यात दाखल झाले होते. त्यामुळे ती साम्राज्यवादी लढाई संपल्यावर आत्मसंतुष्टतेच्या घरकुलात निवारा घेण्यास त्यांचे मन कसे तयार होणार? शिवाय कराचीच्या बराकीतून त्यांनी मध्य आशियातील सरंजामशाही राजवटी कोसळताना उठलेले कोलाहल मिश्रित प्रतिध्वनी ऐकले होते (१९१८–१९२०). त्याचवेळी हेजाज (अरबस्तान) व निकट पूर्वेतील मुस्लिम देश व्यापणाऱ्या साम्राज्यवाद्यांविरुद्ध मुस्लिम भारतामध्ये जी संतापाची लाट उसळली होती तिच्यातही ते सामील झाले होते. जनतेच्या तिरस्कारास पात्र झालेल्या रौलट ॲक्ट (१९१९) मुळे सारा भारत देश ब्रिटिश सत्तेला विरोध करण्यास ठामपणे उभा राहिला होता; आणि गांधीजींनी सत्याग्रहाची भाषा सुरू केली होती. पंजाबमधील अत्याचार आणि त्यांवर जालियानवाला बागेतील (१३ एप्रिल, १९१९) कत्तलीने चढविलेला कळस हे जणू राष्ट्रीय विद्रोहाला आणि प्रत्यक्ष कृतीला निमंत्रणच होते. भारतातील हिंदू-मुसलमानांमध्ये बंडाची जी आग पेटून उठली होती तीच नजरुलच्या अंतःकरणातही उफाळून उठली. ही आग इतर ठिकाणांपेक्षा बंगालमध्ये व कलकत्त्यात अधिक तीव्र होती. नजरुल यांचा निश्चय पक्का झाला. राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठी जोरदार प्रहार करण्याचे व त्यासाठी आपल्या साहित्यगुणांचा वापर करण्याचे त्यांनी ठरविले. मग त्यासाठी कितीही क्लेश भोगावे लागले तरी त्याची त्यांना पर्वा नव्हती. त्यांच्या या निर्णयाला त्यांच्या मित्रांनी पाठिंबा दिला. कारण त्यांच्या साहित्याकडून त्यांना खूपच मोठ्या आशा होत्या. अशा प्रकारे नजरुल यांनी चालून आलेली सरकारी नोकरी फेटाळून लावली; आणि ज्वलज्जहाल उत्साहाने भविष्याच्या अंधारात निर्णायक उडी घेतली.

यावेळी नजरुल यांचे वय २१ वर्षांचे होते.

**प्रकरण : दुसरे**

# योद्धा आणि लेखक : पहिला उद्रेक

१९२० साली काजी नजरुल इस्लाम हे आपल्या पौरुषाची प्रथम अभिव्यक्ती करण्यास पुढे सरसावले. किंबहुना आपण स्वातंत्र्यसैनिकांच्या बाजूने उभे राहावयाचे आणि साहित्याच्या क्षेत्रात कीर्ती व आगळेपणा प्राप्त करावयाचा या निश्चयाने त्यांनी पाऊल उचलले. 'मुस्लिम भारत' हे त्यांच्या कर्तृत्वाचे प्रमुख माध्यम बनणार होते. तेथील त्यांचे मित्र या बाबतीत खूप उत्साही होते; आणि कवीचा आवेश त्यांच्या उत्साहापेक्षाही अधिक होता. या मासिकाचे नाममात्र संपादक प्रख्यात मुस्लिम कवी मुजम्मिल हक्क (शांतिपूर) हे राहाणार असले तरी त्यांचे चिरंजीव अफजल उल हक्क हेच वास्तविक संपादक होणार होते. 'मुस्लिम भारत' ची वास्तविक कचेरी ३२, कॉलेज स्ट्रीट याच ठिकाणी राहाणार होती. त्याचा पहिला अंक (वैशाख, १३२७; एप्रिल ? १९२०) नजरुल यांची 'बाँधन हारा' (बंधमुक्त) ही पहिली कादंबरी घेऊन प्रकाशित झाला. ही कादंबरी पत्ररूपात होती. दर महिन्याच्या अंकातून ती क्रमशः प्रसिद्ध होऊ लागली. त्याखेरीज त्यांच्या जुन्या-नव्या कविताही 'मुस्लिम भारत' मध्ये धूमधडाक्याने प्रसिद्ध होऊ लागल्या. 'सौगात', 'उपासना', 'बिजली' इत्यादी इतर अनेक नियतकालिकांतूनही त्यांच्या कविता प्रकाशित होऊ लागल्या. १३२७ बंगाब्द या वर्षी 'मुस्लिम भारत' मध्ये निजरुल इस्लाम यांचे खालील साहित्य प्रकाशित झाले* :--

१. बाँधन हारा (बंधमुक्त) : कादंबरी

२. कुरबानी (बलिदान) : कविता

३. बादल बरिषण (मेघवर्षा) : प्रतीकात्मक कहाणी

४. बादल-प्रातेर सोहराब[१] (पावसाळी पहाटे केलेली प्रार्थना) : कविता

---

* मुजफ्फर अहमद, 'स्मृति-कथा', आवृत्ती ३, पृ. ६०

(१) हा शब्द फारसी 'सराब' (मृगजळ) किंवा 'शराब' असाही असू शकेल.

५. बोधन ( उद्‌बोधन ) : कविता

६. मोहरम : कविता

७. शात-इल-अरब ( मेसोपोटेमियातील युफ्रेटिस नदीचे अरबी नाव ) : कविता

८. गीते ( ३ गीते )

९. गझल ( हाफिझच्या गझलांचा अनुवाद )

१०. फतवा-इ-दुवाजदोम ( पैगंबराचा जन्मादिन ) : कविता

११. बिरह-बिधुरा ( विरह-व्यथा ) : कविता

१२. मोरोमी ( मर्मी-गूढवादी ) : गीत

१३. स्नेह-भीतु ( प्रेम-भीरु ) : कविता

या रचनांपैकी काही आजही उच्च कोटीच्या समजल्या जातात. त्या काळी तर त्यांनी सर्वांनाच थक्क केले. या नव्या लेखकाचे बहुतेक प्रत्येक क्षेत्रातून उत्सुकतापूर्ण स्वागत झाले. त्यांच्या 'बाँधन हारा' या कादंबरीचेही वाचकांनी कौतुक केले. नजरुल यांची प्रतिभा ही कादंबरीकाराची प्रतिभा नव्हती, हे आपण मान्य केले पाहिजे. या कादंबरीची कथावस्तू हविलदार क्वार्टरमास्टर असलेल्या ( नजरुल यांचा स्वतःचाच तो हुद्दा होता ) कथानायकाच्या कराचीतील अनुभवावर बटबटीतपणे आधारलेली असून ती काव्यात्मता, रोमान्स व भावुकता यांनी भारलेली आहे. परंतु ती प्रकाशित होऊ लागल्यानंतर 'नारायण' या महत्त्वाच्या साहित्यिक मासिकात ( भाद्र १३२७ बंगाब्द; ऑगस्ट १९२० ) तिच्याविषयी अत्यंत अनुकूल अभिप्राय प्रसिद्ध झाला. या मासिकाचे संस्थापक श्री. चित्तरंजन दास हे होते; आणि त्यावेळी त्याचे संपादक बारींद्रकुमार घोष होते. 'मुस्लिम भारत' व 'सौगात' यांमधून प्रकाशित झालेल्या नजरुलच्या कवितांना यापूर्वीच मान्यता प्राप्त झाली होती. 'शात-इल-अरब' ही खास नजरुल-रंग असलेली कविता आहे. इराकमध्ये असलेला एक बंगाली सैनिक त्या देशाला उद्देशून आपले मनोगत व्यक्त करतो आहे, अशी त्या कवितेची भूमिका आहे. त्यामध्ये तो आपल्या स्वतःच्या मातृभूमीची व त्या 'थोर हुतात्म्यांच्या भूमीची' ( इराकची ) समान पराधीनता विशद करून कवी आपले दुःख व्यक्त करतो. अशा प्रकारची ही काही पहिलीच कविता नव्हती, हे खरे; तरीपण तिच्यात देशभक्तीच्या भावना उत्तम प्रकारे उचंबळून आल्या आहेत आणि नादमधुर फारसी-अरबी शब्दांचे व तितक्याच प्रबळ वेगाने धावणाऱ्या बंगाली शब्दप्रवाहाचे सुंदर मिश्रण तिच्यात झाले आहे. कोणालाही मोहून टाकील अशीच ती कविता होती. 'मोहरम' 'बादल-प्रातेर शराब' यांसारख्या इतर कवितांनीही वाचकांना असेच मंत्रमुग्ध करून सोडले.

'मुस्लिम भारत' हे ज्याला आपण 'मुस्लिम विषय' असे म्हणू शकू त्यांच्याशी संबंधित लिखाणाला अनुकूल असे माध्यम होते, हे उघड आहे. त्यामुळे नजरुल यांनी स्वाभाविकपणेच त्याकाळी इस्लामी धार्मिक-सांस्कृतिक प्रसंग व सण यांच्याशी संबंधित विषयांवरील 'मोहरम', 'कुरबानी', 'फतवा-ए-दुवाजदहम' यांसारख्या वर उल्लेखिलेल्या कविता त्या मासिकात लिहिल्या त्यांमध्ये उत्तम काव्यगुण होते, यात शंका नाही; तरीपण इतर कारणांसाठी त्या महत्त्वपूर्ण होत्या.

संस्कृत मूलस्रोतांशी संबंधित विषयांच्या बाबतीत बंगाली साहित्य जेवढे समृद्ध होते त्यामानाने फारसी-अरबी मूलस्रोतांशी संबंधित विषयांच्या बाबतीत ते फारसे समृद्ध नव्हते. याचे प्रमुख कारण असे की जुन्या काळी बंगालीमध्ये मुस्लिम लेखक फार कमी होते; आणि जे थोडे होते त्यांच्याकडे बुद्धिवंतांनी दुर्लक्षच केले. जुन्या सरंजामशाहीच्या जमान्यात, युरोपमध्ये जशी लॅटिन ही बुद्धिवंतांची भाषा होती तशी फारसी ही भारतीय बुद्धिवंतांची विशेष पसंतीची भाषा होती. आता नजरुल यांनी बंगाली साहित्यात फारसी-अरबीशी संबंधित विषयांना साहित्यिक प्रतिष्ठा मिळवून देण्यास सुरुवात केली; आणि बंगालमधील हिंदूंना त्या विषयांचे रसग्रहण करण्यास उद्युक्त केले.

वातावरणही या गोष्टीला अनुकूल व शुभ होते. खिलाफत चळवळीने साम्राज्यवाद विरोधी व्यासपीठावर मुसलमानांना हिंदूंच्या अधिक जवळ आणले होते; आणि या दोन्ही जमाती एकमेकांच्या सांस्कृतिक-धार्मिक बाबींची माहिती करून घेण्यास अधिक उत्सुक झाल्या होत्या. तसेच, सर्व सांस्कृतिक व साहित्यिक प्रयत्न राष्ट्रीय ऐक्य व राष्ट्रीय संघर्ष यांना हातभार लावणारे आहेत, हे ओळखून त्यांचे स्वागत करण्यासही दोन्ही जमाती तयार होत्या. सप्टेंबर १९२० मध्ये कलकत्त्याला काँग्रेसच्या खास अधिवेशनात असहकाराचा ठराव (१९२०) पास झाला होता. खरे म्हणजे, नजरुलच्या अंतःप्रवृत्तीला जसे हवे होते त्याप्रमाणे सार्वजनिक जीवन अनुकूल बनत चालले होते. व्यक्तिशः ते, अंदमानमधून शिक्षा भोगून आलेले बारींद्रकुमार घोष व अविनाश भट्टाचार्य, संगीतज्ज्ञ नलिनीकांत सरकार, आणि यांसारखेच इतर जहालमतवादी व क्रांतिकारक यांच्या संपर्कात येऊन त्यांच्याशी मैत्रीसंबंध प्रस्थापित करू लागले होते. त्यांची साहित्यिक कामगिरी, पुरोगामी दृष्टिकोन आणि दिलदारपणा यामुळे 'बिजली'-च्या राजकीय व साहित्यिक वर्तुळात त्यांना मनःपूर्वक प्रविष्ट करून घेण्यात आले. मुस्लिम बंगालचा हा प्रतिभाशाली सुपुत्र भावी राष्ट्रीय ऐक्याचा अग्रदूत ठरणार, याचेच जणू हे शुभचिन्ह होते.

अशा प्रकारे काही महिन्यांच्या अवधीतच काजी नजरुल इस्लामचे नाव हे बंगालमधील विवेचक वाचक व संपादक आणि विशेषतः नव्या पुरोगामी विचारांची माणसे व वृत्तपत्रे यांच्या दृष्टीने स्वागतार्ह समजले जाऊ लागले.

स्वराज्याच्या संघर्षात सुशिक्षित वर्गापेक्षा सामान्य जनता ही अधिक महत्त्वाची आहे, असे ते मानीत होते, हे उघड आहे. नजरुल हे त्याचे प्रमुख आधारस्तंभ होते. त्यांची लेखणी सामर्थ्यशाली होती. कोणत्याही बातमीचे महत्त्व चटकन त्यांच्या ध्यानी येई, आणि इतरांची जागा भरून काढण्याची अद्भुत क्षमता त्यांच्यामध्ये होती. याहूनही अधिक उल्लेखनीय गोष्ट अशी की त्यांच्या वृत्तपत्रीय टिपणांमध्ये त्यांच्या स्वाभाविक उत्साहाला विनोदाची एक झालर होती. त्यामुळे 'नवयुग'च्या भावनापूर्ण, किंबहुना सळसळत्या आवेशाने भरलेल्या संपादकीयां-मध्ये एक प्रकारचा समतोल निर्माण होई. 'नवयुग'ची कचेरी जवळ पडावी म्हणून ते दोघे मित्र टर्नर स्ट्रीटवर राहावयास गेले. टर्नर स्ट्रीटवरील त्यांच्या छोट्या खोल्या म्हणजे सर्व प्रकारच्या साहित्यिकांचा व जहाल मतवादाकडे ओढा असलेल्या राजकीय लोकांचा सदैव गजबजलेला अड्डाच बनला. अर्थात् त्याचे श्रेय नजरुल यांनाच होते. 'नवयुग' दैनिक हिंदू व मुसलमान या दोन्ही जमातींत चांगलेच लोकप्रिय झाले. कारण त्याची साम्राज्यशाही विरोधी जहाल भूमिका लोकांना हवीशी वाटणारीच होती. पण त्याच्या त्या यशामुळेच काही समस्या निर्माण झाल्या. पोलीस आणि तत्कालीन सरकार यांनी दैनिकातील लिखाणाला जोरदार आक्षेप घेतला. त्याच्याकडून सुरुवातीस घेण्यात आलेला एक हजार रुपयांचा जामीन जप्त करण्यात आला; आणि नव्याने दोन हजार रुपयांचा जामीन मागण्यात आला. ही रक्कम कशी उभी करावयाची, ही संपादकांना एक डोकेदुखीच झाली— हा जामीनही काही महिन्यांनंतर पहिल्या जामिनासारखाच जप्त होणार होता. पत्राचे मालक फजलुल हक्क हे त्यांच्या स्वभाववैशिष्ट्याप्रमाणे सर्व प्रकारच्या चिंतेपासून मुक्त होते; आणि ही जामिनाची रक्कम जमविण्यास ते फारसे उत्सुक नव्हते, हे-ही समजण्यासारखे होते. अर्थात् दैनिकाचे संपादक व त्यांचे लिखाण यामध्ये ते हस्तक्षेप करीत नव्हते, हेही मान्य केले पाहिजे. ते कट्टर राष्ट्रवादी होते; आणि सामान्य माणसाविषयी त्यांना मनापासून सहानुभूतीही वाटत होती. परंतु प्रचलित राजकारणापासून ते दूर जात होते. महात्मा गांधी आणि त्यांनी पुढे मांडलेली असहकाराची कल्पना या भोवती लोक गोळा होत होते. 'नवयुग' १२ जुलै १९२० रोजी सुरू झाले. ऑगस्टमध्ये कलकत्त्यात भरलेल्या काँग्रेसच्या खास अधिवेशनाने असहकाराच्या ठरावाला मान्यता दिली. या ठरावानुसार शाळा-कॉलेजे व न्यायालये यांवर बहिष्कार टाकण्याचा कार्यक्रम हाती घ्यावयाचा होता. फजलुल हक्क हे स्वतः वकील होते. त्यांना हे असहकाराचे धोरण मान्य नव्हते. जेव्हा 'नवयुग'चा पहिला जामीन जप्त झाला तेव्हा त्यांना बरे वाटले नाही; अथवा नवीन जामिनाची रक्कम उभारण्याचीही त्यांनी खटपट केली नाही. ही रक्कम मिळविण्यासाठी दैनिक तात्पुरते बंद ठेवण्यात आले. श्री. हक्क यांनी या तरुण संपादकांना चाखार या बारिसाल जिल्ह्यातील आपल्या खेडेगावातील घरी पाहुणे

म्हणून बोलावले. त्यांच्याशी स्नेहाची बोलणी केल्यानंतर ते तरुण लेखक राजकीयदृष्ट्या आपल्याजवळ येतील अशी आशा त्यांना वाटत होती. पण ते तरुण संपादक राजकीयदृष्ट्या जहाल मतांचे होते. त्यांनी पुनः 'नवयुग' सुरू केले; आणि ते व हक यांच्यातील दरी वाढतच गेली. त्यानंतर जवळ जवळ अचानकपणेच नजरुल यांनी १९२० च्या डिसेंबरमध्ये 'नवयुग' सोडले. त्यानंतर काही दिवसांनी अहमद यांनीही त्यातून अंग काढून घेतले. नजरुल कलकत्ता सोडून देवघरला गेले. तेथे विश्रांती घ्यावी आणि 'वृत्तपत्रीय लिखाणात आपली शक्ती वाया घालविण्याऐवजी' साहित्यिक लिखाण करावे असा त्यांचा विचार होता. ते जे काही लिहितील ते प्रकाशित करण्याबद्दल 'मुस्लिम भारत'च्या संचालकांनी नजरुल यांना देवघर येथे दरमहा १०० रुपये द्यावयाचे ठरले होते. परंतु तो करार प्रत्यक्षात उतरला नाही. नजरुल यांना काहीच मिळाले नाही. ते देवघरमध्ये परके होते; त्यामुळे सुमारे दोन महिन्यांनंतर त्यांना कलकत्त्याला परत यावे लागले. एवढेच नव्हे तर थोड्या काळासाठी त्यांना पुनः 'नवयुग' मध्येही जावे लागले.

देवघरमधील त्यांचा अल्पकालीन मुक्काम दोन कारणांसाठी उल्लेखनीय आहे : नजरुल किती भोळसट आणि किती पराकाष्ठेचे निष्काळजी होते, ते त्यावरून दिसते. अशा एका परक्या ठिकाणी ते जाऊन राहिले की जेथे त्यांचे स्वागत करणारे कोणी नव्हते अथवा तेथे राहाण्या-खाण्यासाठी द्यावे लागणारे पैसेही त्यांच्याजवळ नव्हते. दुसरे असे की, कोणत्याही कारणाने असो, त्या ठिकाणी नाव घेण्यासारखे काहीच लिखाण त्यांच्या हातून लिहून झाले नाही. 'वेदनहारा' यांसारखी एक-दोन गीतेच काय ती त्यांनी तेथे लिहिली. तथापि, त्यांची तेथील दुरवस्था समजताच श्री. अहमद देवघरला गेले; आणि आपण वर पाहिल्याप्रमाणे ते लौकरच नजरुलना घेऊन कलकत्त्याला परतले. काही गैरसमज असल्यास तो दूर व्हावा म्हणून येथे हे सांगितले पाहिजे की मुजफ्फर अहमद हेही नजरुल-प्रमाणेच केवळ साम्राज्यशाही-विरोधी आणि कामगार वर्गाच्या – कामकरी स्त्री-पुरुषांच्या – हक्कांचे उघड-उघड पुरस्कर्ते होते. १९२० साली किंवा १९२१ च्या प्रारंभी अहमद यांचा साम्यवाद्यांशी प्रत्यक्ष संबंध स्थापित झालेला नव्हता, ही गोष्ट त्यांच्या आत्मचरित्रावरूनही स्पष्ट होते. तरी पण 'नवयुग'च्या लिखाणामध्ये त्यांचा वर्गीय कल स्पष्ट दिसून येतो.

अखेर 'नवयुग' ला रामराम ठोकून नजरुल यांनी दुसऱ्या एका वैयक्तिक दुर्दैवामध्ये स्वतःला झोकून दिले. या खेपेला त्यांचे हे दुःसाहस खरोखरीच बेडौल आणि वीट आणणारे ठरले. अली अकबरखान नावाच्या एका इसमाने 'मुस्लिम भारत'च्या कचेरीत नजरुलशी दोस्ती केली होती. तो मुलांसाठी पाठ्यपुस्तके प्रकाशित करणारा प्रकाशक आहे, अशी समजूत होती. त्याने नजरुलकडून

' लिचुचोर ' ( लीची नावाचे फळ चोरणारा ) नावाची एक सुंदर कविता मिळविली होती. या खानाने मनाशी एक योजना आखली आणि नजरुलची दोस्ती संपादन केली. पूर्व बंगालच्या टिप्पेरा जिल्ह्यातील (आता या जिल्ह्याचे नाव त्याच्या मुख्यालयावरून कोमिल्ला असे ठेवण्यात आले आहे ) दौलतपूर नावाच्या गावी या खानाचे घर होते. नजरुल यांनी आपल्याबरोबर आपल्या घरी यावे, अशी त्याने गळ घातली. नजरुल तयार झाले; आणि त्याप्रमाणे ते १९२१ च्या मार्च किंवा एप्रिल महिन्यात दौलतापूरला जाण्यास निघाले. वाटेत कोमिल्ला या शहरी ते चार-पाच दिवस राहिले. त्या ठिकाणी कांदिरपार या भागात राहाणारे इन्द्रकुमार सेनगुप्त यांच्या कुटुंबाने पाहुणे म्हणून त्यांचे आनंदाने स्वागत केले. अली अकबर हा इंद्रकुमार बाबूंचा मुलगा वीरेंद्रकुमार सेनगुप्त याचा शाळूसोबती होता. खानाचे मित्र म्हणून नजरुल यांचेही त्या घरात चांगले स्वागत झाले. ते एक मध्यमवर्गीय कुटुंब होते. तसे फारसे सुखवस्तू नव्हे, परंतु सुशिक्षित व उदारमतवादी होते. त्या मंडळींना संगीत व साहित्य यांची लक्षणीय आवड होती. या दृष्टीने नजरुल त्यांना विशेष स्वागतार्ह वाटले असल्यास नवल नाही. घरची मालकीण, इंद्रबाबूंच्या पत्नी बिराजसुंदरीदेवी मोठ्या मायाळू व लोभस स्वभावाच्या होत्या त्यांच्यासारख्या इतर स्त्रियांमुळे आजही बंगाली समाज ही एक सुखदायक संस्था बनलेली आहे. त्यांच्यातील मातृवात्सल्यामुळे त्यांच्याभोवती अनेक मित्रमंडळी गोळा झाली होती. त्या आपल्या सर्वांच्या माताच आहेत, अशी त्या लोकांची भावना होती. अशा प्रकारच्या अकृत्रिम प्रेमाला सहज प्रतिसाद देणारे निरागस अंतःकरणाचे नजरुल त्याबाबतीत उणे पडले नाहीत. थोड्याच वेळात ते बिराजसुंदरीदेवींना ' मा ' ( आई ) आणि त्यांची जाऊ गिरिबालादेवींना ' मासी मा ' ( मावशी ) म्हणू लागले. एवढी जवळीक त्यांच्यांत निर्माण झाली. गिरिबालादेवी या विधवा होत्या. त्यांना प्रमिला नावाची एकुलती एक मुलगी होती. तिला सर्वजण ' दुलि ' किंवा ' दोलन ' ( हिंदोला ) या लाडक्या नावाने संबोधीत. त्यावेळी तिचे वय १३ वर्षांपेक्षा अधिक नव्हते. अशाप्रकारे एका आठवड्यापेक्षाही कमी अवधीत त्यांच्यामध्ये स्नेहसंबंध निर्माण झाला. सारे काही सहज व स्वाभाविकपणे घडले. त्या मैत्रीतून कालांतराने फार मोठ्या घटना घडतील, याची कोणालाही कल्पना नव्हती. कारण त्यांचा विवाह कालांतराने प्रमिलाशी व्हायचा होता. परंतु त्यावेळी मात्र कोणाच्याही मनात त्याची पुसटशीही कल्पना नव्हती; आणि प्रमिला तर त्यावेळी फक्त १३ वर्षांची मुलगी होती.

लौकरच अली अकबरखानाबरोबर नजरुल दौलतपूरला गेले. परंतु दोन महिन्यांच्या आतच कलकत्त्यातील त्यांच्या मित्रांना दौलतपूर येथे होणाऱ्या नजरुल यांच्या विवाहाचे अचानक निमंत्रणपत्र मिळाले तेव्हा त्यांना आश्चर्याचा

धक्काच बसला. त्यांच्या पत्रानुसार अली अकबरखानाच्या एका विधवा बहिणीची मुलगी नरगिस बेगम (सैदा खातून) हिच्याशी जून (१९२१) च्या मध्यास नजरुल यांचा विवाह होणार होता. कवींचे आचरण विचित्र असल्याची नशी ख्यातीच आहे. ते झटकन् प्रेमात पडतात आणि पटकन् लग्न करून मोकळे होतात. नजरुल हे स्वभावाने आणि जडणघडणीने अगदी अशाच प्रकारचे कवी होते; आणि त्यांनी आपल्या खास उत्साहाने कोमिल्लाच्या सेनगुप्त कुटुंबातील सर्व लहानथोर स्त्रीपुरुषांना आपले सर्वांत जवळचे नातेवाईक म्हणून दौलतपूरला साजऱ्या होणाऱ्या आपल्या विवाहसमारंभास हजर राहाण्याची गळ घातली. त्याप्रमाणे ती सारी मंडळी आलीही. परंतु सर्वांनाच आश्चर्याचा धक्का बसावयाचा होता. लग्नाचा दिवस अगदी जवळ येऊन ठेपला असता अली अकबरने आपल्याला सापळ्यात पकडण्याचा व्यूह रचला असल्याचे नजरुल यांच्या ध्यानात आले. ज्या तरुणीशी त्यांचे लग्न होणार होते तिला नजरुल यांच्याविषयी आकर्षण वाटत होते हे खरे; पण ती अगदीच गावंढळ मुलगी होती. तिला शिक्षणाचा गंध नव्हता आणि अशा परिस्थितीत जे सामाजिक गुण असणे इष्ट असते तेही तिच्या अंगी नव्हते. बहुधा ती दिसायलाही फारशी देखणी नसावी. त्या प्रकाराने नजरुल आधीच वैतागले होते. त्यात पुनः लग्नाच्या दिवशी अली अकबरखानाने लग्नासंबंधी जो करार तयार केला होता त्यामध्ये नजरुल यांना आपल्या हातचे बाहुले बनविणाऱ्या काही अटी त्याने समाविष्ट केल्या असल्याचे यांना आढळून आले. अशा प्रकारचा अपमान सहन करणे स्वाभिमानी नजरुल यांना शक्यच नव्हते. ते रागारागाने दौलतपूरहून निघाले आणि कोमिल्लाला आले. सेनगुप्त कुटुंबही दुसऱ्या दिवशी दुःखी व गोंधळलेल्या अंतःकरणाने परत फिरले.

अशा प्रकारे एका क्लेशकारक घटनेचा शेवट झाला. तरीपण या घटनेवरील धुक्याचा पडदा अजूनही तसाच उरला आहे. कलकत्त्यामध्ये अली अकबरखानाने पुनः एकदा दिलजमाई करण्याचा प्रयत्न करण्यासाठी नजरुल यांची भेट घेतली होती, असे म्हणतात. परंतु आता काहीच होणे शक्य नव्हते. त्याबाबतीत नजरुल यांनी पूर्णपणे आपले अंग काढून घेतले होते. या प्रकरणासंबंधी काही लोकांच्या मनात काही प्रश्न राहूनच गेले : नजरुल यांनी दौलतपूर सोडण्यापूर्वी ते लग्न खरोखरी पार पडले होते काय? मुजफ्फर अहमद म्हणतात की लग्न लागलेले नव्हते. आम्हालाही तसेच वाटते. तरीपण अली अकबरखान याने हे लग्न झाले असल्याबद्दल लोकांची खात्री पटविण्याचा खूप प्रयत्न केला. मात्र या बाबतीतील त्याचा पुरावा संशयास्पद होता. परंतु लग्न निश्चित होण्यापूर्वी वधू आणि वर यांमध्ये एकमेकांविषयी नाजुक प्रेमभावना अंकुरल्या होत्या, असे समजण्यास बळकट कारणे आहेत. नरगिस बेगमला नजरुल इस्लामनी पाहिले

तेव्हा ती तारुण्याच्या ऐन भरात असावी, असे दिसते. ते तिच्याकडे चटकन् आकर्षित झाले; आणि ते तिच्या प्रेमात इतके गुरफटले की त्यांनी मनापासून तिच्याशी विवाहबद्ध होण्यास आपली संमती दिली. परंतु अली अकबरखान याने यावेळी जरा जास्त हातचलाखी करण्याचा प्रयत्न केला; आणि त्याची भाची नरगिस बेगम आपल्या मामाच्या या डावपेचात निष्क्रिय सहभागी झाली असावी, असे दिसते. लग्नाच्या करारात नजरुल यांना अडकवून आपल्या प्रकाशन संस्थेसाठी भावी काळात हुकमी भाडोत्री लेखक म्हणून त्यांना पूर्णपणे आपल्या कबज्यात ठेवायचे अशी त्याची योजना किंवा डाव होता. त्यामुळे नजरुल यांचा ताबडतोब भ्रमनिरास झाला आणि अखेर त्यांनी त्याच्याविरुद्ध बंड केले. नंतरच्या घटनांवरून असे दिसते की तीही या सगळ्या प्रकरणातून कसलीही दुखापत न होता, सहीसलामत पार पडली नाही. ती पुढे अनेक वर्षे-पर्यंत अविवाहित राहिली; आणि नजरुल यांना आदरपूर्ण पत्रे लिहून त्यांच्याशी आपला संबंध प्रस्थापित करण्याचा ती प्रयत्न करीत राहिली. तथापि नजरुल यांनी तिच्या भावनांना कधीही प्रतिसाद दिला नाही. नाही म्हणायला त्यांनी तिला फक्त एकच पत्र लिहिले–'पहिले आणि शेवटचे'. हे पत्र १ जुलै १९३७ च्या सुमारास लिहिले होते. त्यात त्यांनी साफ साफ नकार दिला होता. स्पष्ट शब्दांत सारे काही नाकारले होते. मात्र याच तारखेला त्यांनी हिज मास्टर्स व्हॉईससाठी ताबडतोब एक गीत रचले होते. त्या गीतातून त्यांचे मनोगत स्पष्टपणे व्यक्त होते. ते म्हणतात,

जार हाते दिये माला दिते पारो नाइ
केनो मने राखो तारे ?
भुले जाओ तारे भुले जाओ एकेबारे ।

(ज्याच्या हाती तू वरमाला देणार होतीस आणि ज्याला ती तू देऊ शकली नाहीस, त्याची तू कशाला आठवण काढतेस ? त्याला विसरून जा; पूर्णपणे विसरून जा.)

ते पत्र आणि ते गीत हा निर्णायक पुरावा आहे असे दिसते. एकदा निर्माण झालेली दरी पुनः कधीच भरून येणे शक्य नव्हते. त्या मुलीला नंतर तिच्या योग्य नवरा मिळाला आणि ती आपले वैवाहिक जीवन शांतपणे घालवीत राहिली. अशाप्रकारे हे प्रकरण खरोखरी सुरू होण्याच्या पूर्वीच संपले. तरीपण त्याच्यामुळे एक दुःखपूर्ण व निराधार कहाणी आणि वाद मात्र चालत राहिला.

दौलतपूरला झालेला हा फज्जा किंवा विचका नजरुल यांच्या कविता व गीते यांच्यावरील सारी नियंत्रणे नाहीशी करून त्यांना धो-धो वाहविण्यास कारणी-भूत झाला, हा एक चमत्कारच म्हटला पाहिजे. नजरुल यांच्या भावाळ हृदयाने

आपले स्वास्थ्य परत मिळविण्यासाठी स्वाभाविकपणे आपला स्वतःचा मार्ग अवलंबिला. सुमारे तीन आठवडे ( १८ जून ते ६ जुलै १९२१ ) ते कोमिल्ला येथे सेनगुप्त कुटुंबाच्या मायाळू छत्रछायेत राहिले. या काळात त्यांच्या सर्जनशील कृतींना आणखी एक बहर आला. त्यावेळी त्यांच्या मनात ज्या विविध प्रकारच्या भावना उत्पन्न झाल्या त्यांतून त्यांच्या या कवितांची निर्मिती झाली होती. १९२१ च्या मे-जून महिन्यात सारा बंगाल आणि विशेषतः कोमिल्ला श्री सी. आर. दास यांच्या नेतृत्वाखाली असहकाराच्या चळवळीने हवळून निघाला होता. नजरुलनी तत्परतेने त्या राजकीय परिस्थितीला प्रतिसाद दिला. त्या काळच्या त्यांच्या विशेष प्रख्यात राजकीय गीतांपैकी 'मरण बरण' ( मृत्यूचे स्वागत ) हे एक होते. त्याचा पहिला चरण असा होता : 'एशो, एशो, एशो, ओगो मरण !' ( हे मरणा, ये, ये, ये ! ) निर्भयपणे मरणाला सामोरे जाण्यास लोकांना प्रवृत्त करून उत्तेजन देणे ही या गीताची मूलभूत कल्पना होती.

ज्यांना जनतेच्या किंवा पब्लिकच्या कविता म्हणता येईल अशा या कविता होत्या. परंतु याच वेळी वेगळे सूर अथवा भावभावना असणाऱ्या कविता व गाणी यांचेही लेखन चालू होते. कालांतराने त्या 'पूबेर हवा' ( पूर्वेकडील वारा ) या नावाच्या संग्रहात एकत्रित करण्यात आल्या. त्यांमध्ये वैयक्तिक कोवळीक, ओजस्विता व माधुर्य हे गुण भरपूर होते. उदाहरणार्थ 'दुपुर अभिसार' ( दुपारचा अभिसार ) या कवितेत ते म्हणतात, 'जास कोथा सइ एकेला ओ तुइ अलस वैशाखे !' ( हे सखी, या आळसावलेल्या वैशाखात तू एकटीच कुठे चाललीस !)

किंवा 'रेशमी डोर' ( रेशमी धागा किंवा रेशमी गाठ ) या श्री सेनगुप्त यांच्या घरच्या मुलांना उद्देशून लिहिलेल्या कवितेत ते म्हणतात,

तोरा कोथा हते केमने एसे मणिमालार मतो
आमार कंठे जड़ालि !

( तुम्ही कोठून आणि कसे माझ्या गळ्यातील रत्नहार बनलात ! )

दौलतपूरच्या फजीतवाड्यानंतर त्यांना प्रेमाची व स्नेहाची अत्यंत गरज होती. या दोन्ही गोष्टी त्यांच्या दुःखी-कष्टी व भुकेलेल्या हृदयाला सेनगुप्त कुटुंबाकडून मिळत होत्या. त्याचाच जणू निर्देश त्यांनी या काव्यपंक्तीमध्ये केला असावा, हे उघड आहे हीच भावना 'स्नेहातुर' या गीतामध्ये व्यक्त झाली आहे. हे गीत त्या कुटुंबातील मातेप्रमाणे अधिराज्य करणाऱ्या व्यक्तीला उद्देशून लिहिलेले होते. तिच्या मायाळूपणाने नजरुलच्या जीवनातील पोकळी भरून काढली होती. अशाच प्रकारचा एक निर्देश 'अभिमानिनी' या दीर्घ विलापिकेत आढळून येतो. त्यावेळी त्या गृहिणीच्या एका अल्पवयीन कन्येच्या मृत्यूला उद्देशून ती दीर्घ कविता लिहिलेली होती. परंतु 'पुलक' सारख्या गीतांमध्ये आनंद व उत्साह यांचे सूरही अधूनमधून प्रस्फुटित झालेले दिसून येतात.

'पुलक' मध्ये निसर्गातील रंगांची उधळण पाहून कवी आनंदाने अगदी बेहोश झाला आहे. त्या गीतातील अभिव्यक्तीचा ढंग पाहता दृक्-श्रवण संवेदनांशी नजरुल यांची तार कशी जमली होती, याचा प्रत्यय येतो. यांपैकी बहुतेक गीते व कविता यांचा समावेश १९२५ साली प्रसिद्ध झालेल्या 'पुबेर हवा' (पूर्वेकडील वारा) या संग्रहात नंतरच्या रचनांबरोबर झालेला आहे. अर्थात् जुलै १९२१ मध्ये आपले जीवन व साहित्यिक कार्य पुढे चालविण्यासाठी मुजफ्फर अहमद् यांच्याबरोबर नजरुल कलकत्त्याला परतल्यानंतर त्या वर्षीच्या बंगाली नियत-कालिकांमध्ये त्यांच्या या रचना प्रथम प्रकाशित झाल्या होत्या.

खरे म्हणजे १९२१ हे साल भारताच्या व बंगालच्या दृष्टीने इतके खळबळीचे होते की, एखादी असाधारण आत्मकेंद्रित व्यक्ती वगळता, कोणालाही आपल्या वैयक्तिक जखमा कुरवाळीत बसायला सवडच नव्हती. नजरुल यांची घडणच स्वभावतः वेगळी होती. आपण वर पाहिल्याप्रमाणे कोमिल्ला येथेही त्यांनी दौलतपूरच्या दुःखद घटनेवर मात केली होती. त्याचे श्रेय एका बाजूने सेनगुप्त कुटुंबाच्या स्नेहपूर्ण आत्मीयतेला होते तर दुसऱ्या बाजूने पूर्व बंगालमधील त्या शहरात राजकीय चळवळीच्या उसळलेल्या लाटेला होते. जुलै १९२१ मध्ये कलकत्त्याला परत आल्यानंतर ते आपल्या पूर्वपरिचित सामाजिक जीवनात सहज एकरूप होऊन गेले. राजकीय खळबळ, साहित्यिक प्रवृत्ती, अड्ड्यामध्ये अखंडपणे चालणाऱ्या गप्पागोष्टी, आणि बंगाली जीवनाचे अभिन्न अंग असलेल्या संगीताच्या व गाण्याच्या मैफली यांमध्ये ते रंगून गेले. अर्थात् उपजीविकेच्या साधनाबाबत अजूनही अनिश्चितताच होती. या कामांसाठी एक नवीन दैनिक काढावे या हेतूने त्याच्या आर्थिक तरतुदीसाठी एक लिमिटेड कंपनी काढण्याचा प्रयत्न अहमद् यांनी चालविला होता. तो प्रयत्न सफल झाला नाही. परंतु त्यामुळे नजरुल यांच्या काव्य-गीत-निर्मितीत काही व्यत्यय आला नाही.

नजरुल यांच्या १९२१-२२ सालातील उल्लेखनीय कवितांमध्ये दोन कविता कवी सत्येन्द्रनाथ दत्त यांना उद्देशून लिहिलेल्या होत्या, याचा उल्लेख या संदर्भात केला पाहिजे. आम्ही पूर्वी सांगितल्याप्रमाणे सत्येन्द्रनाथ दत्त हे टागोरांच्या खालोखाल दुसऱ्या क्रमांकाचे कवी समजले जात होते. त्यांची दृष्टी झपाट्याने नाहीशी होत चालली होती; किंबहुना ते आपल्या वयाच्या चाळिसाव्या वर्षी होणाऱ्या (२४ जून १९२२) अकाली निधनाकडे वेगाने वाटचाल करीत होते. सत्येंद्रनाथांची दुःखद स्थिती पाहून नजरुलचे अंतःकरण हेलावले; आणि त्यांनी सप्टेंबर १९२१ मध्ये त्यांना उद्देशून 'दिल-दरदी' (प्रेमळ हृदय) या नावाची कविता लिहिली. त्या कवितेतील प्रांजळपणाने सत्येंद्रनाथ द्रवित झाले आणि ते ज्येष्ठ कविवर्य जातीने नजरुल यांचे आभार मानण्यासाठी त्यांच्या तालतोला गल्लीतील बिऱ्हाडी गेले. परंतु दुर्दैवाने ही भेट घडून आली नाही; कारण त्यावेळी

नजरुल कोठे बाहेर गेले होते. त्या दोन कवींमध्ये अनेक गोष्टी समान होत्या. उत्कट देशभक्ती व पुरोगामी सामाजिक दृष्टिकोण या बाबतीत दोघेही समान होते. शिवाय त्यांच्यामध्ये अत्यंत उच्च कोटीची, सूर व लय यांविषयीची अभिरुचीही समान होती. सत्येंद्रनाथ यांचे देहावसान त्यानंतर एका वर्षाने होणार होते. ती शोकपूर्ण घटना टागोरांच्या एका अभिजात कवितेस कारणीभूत झाली; आणि नजरुल यांनीही शोकार्त होऊन एक तितकेच अभिजात गीत लिहिले व ते शोकसभेत गाऊन दाखविले. त्या गीताच्या प्रारंभिक ओळी अशा होत्या :–

चल-चंचल बानीर दुलाल एसेछिलो पथ भुले,
ओगो एइ गंगार कुले ।

( सरस्वतीचा हा चंचल, लाडका सुपुत्र आमच्या या गंगेच्या किनाऱ्यावर चकून जन्माला आला होता. )

सत्येन्द्रनाथांना नजरुलनी या प्रसंगाच्या निमित्ताने तिसरी एक आदरांजली वाहिली. त्या कवितेचे शीर्षक आहे, ' सत्य-कवि '. व्यक्ती आणि कवी या दोन्ही दृष्टींनी सत्येंद्रनाथांना साजेल अशाच ही आदरांजली होती. या कवितेमुळे नजरुल यांचा वैयक्तिक प्रांजळपणा व कविकर्तृत्व या दोन्ही दृष्टींनी त्यांची कीर्ती वाढली. दोन्ही कवी सत्याचे कैवारी होते आणि आपले काव्य, समकालीन घटना व जनतेचे संघर्ष यांच्याशी दोघेही प्रामाणिक होते.

ही परिस्थिती लक्षात येण्यासाठी येथे हे सांगितले पाहिजे की या काळात ( जुलै १९२१-१९२२ ) राजकीय जीवनामध्ये एक पेचप्रसंग निर्माण झाला होता. मौलाना मुहम्मद अली व मौलाना शौकत अली या ' अलीबंधूं'ना ' कराची खटला ' या नावाने प्रसिद्ध असलेल्या खटल्यामध्ये दीर्घ मुदतीच्या तुरुंगवासाची शिक्षा झाली होती. या खटल्यात शिक्षा झालेल्या इतर पुढाऱ्यांमध्ये प्रारंभी शिक्षा झालेल्यांपैकी हे दोघे होते. त्या प्रसंगी लोक क्रुद्ध झाले होते. अशा वेळी आपल्या कवितांच्या द्वारा नजरुल लोकक्षोभामध्ये सहभागी झाले. परंतु १९२१ साली वातावरणामध्ये नुसता क्रोधच नव्हता, तर दृढ निश्चय व अपेक्षा याही गोष्टी होत्या. गांधीजींनी ' एका वर्षात स्वराज्य ' मिळवून देण्याचे जे अभिवचन दिले होते त्यानुसार ते ' स्वराज्याचे वर्ष ' होते. जसजसे दिवस जात होते तसतसे राजकीय आंदोलन अभूतपूर्व महापुराप्रमाणे आठवड्या-आठवड्याला अधिकाधिक प्रबळ होत होते. शेवटच्या तिमाहीत ब्रिटिश सत्ताधाऱ्यांना आपली कोंडी झाल्याचे आढळून आले. त्या भयचकित अवस्थेत त्यांनी अत्यंत कठोरपणे व निर्लज्जपणे उलट प्रहार केला. चळवळीवर मात केली पाहिजे आणि काँग्रेसच्या हालचालींना पायबंद घातला पाहिजे, असे त्यांनी ठरविले. स्वराज्याचा कार्यक्रम नेटाने पुढे नेणारी काँग्रेस सेवा दल ही कार्यकर्त्यांची एक जोरदार संघटना होती.

त्यामुळे भारताच्या बहुतेक सर्व प्रांतांमध्ये तिच्यावर बंदी घालण्यात आली. त्याचा ताबडतोब परिणाम असा झाला की काँग्रेसजनांनी त्या बंदीहुकुमाविरुद्ध सामुदायिक स्वरूपाचा शांततापूर्ण प्रतिकार म्हणजेच सत्याग्रह सुरू केला. हजारो स्त्रीपुरुष पुढे आले आणि त्यांनी स्वतःला अटक करवून घेतली. तीन सत्याग्रही महिलांच्या पहिल्या तुकडीचे नेतृत्व कलकत्त्यात श्री सी. आर. दास यांच्या पत्नी बसुमतीदेवी यांनी केले; आणि सबंध देशभर त्यानंतर शेकडो लोक सत्याग्रहात सहभागी झाले. प्रत्येक प्रांतामध्ये या चळवळीचे पुढारी व हजारो अनुयायी यांनी शांतपणे सत्याग्रह करून स्वतःला अटक करवून घेतली, न्याया-लयात स्वतःचा बचाव करण्याचे नाकारले आणि तुरुंगवासाच्या शिक्षा आनंदाने स्वीकारल्या. त्यामुळे जेव्हा 'खास तुरुंग' ही भरून गेले आणि कैद्यांना ठेवण्यास जागा उरली नाही तरीही स्वतःचे हाल करून घेण्यासाठी लोक स्वतःला अटक करवून घेतच राहिले, तेव्हा त्यांच्यावर खटला न भरता त्यांना सोडून देण्यात येऊ लागले. आपल्या बहुतेक थोर काँग्रेस पुढाऱ्यांच्या दृष्टीने तुरुंगभरतीचा किंवा आत्मक्लेशाचा हा पहिलाच प्रसंग होता. चित्तरंजन दास, मोतीलाल नेहरू, हकीम अजमलखान, डॉक्टर अन्सारी यांसारखे ज्येष्ठ नेते व जवाहरलाल नेहरू, सुभाषचंद्र बोस यांसारखे त्यांचे कनिष्ठ सहकारी यांनी या सत्याग्रहात तुरुंगवास भोगला. आपल्याला माहीतच आहे की त्यावेळेपासून १९४७ साली देशाला स्वातंत्र्य मिळेपर्यंत या नेत्यांना वारंवार तुरुंगवास भोगावा लागला. स्वातंत्र्याची आकांक्षा जागृत झालेल्या लाखो भारतीयांच्या मनातून ब्रिटिश तुरुंगाची भीती नाहीशी झाली, आणि तुरुंगवास हे देशसेवेचे एक सन्माननीय पदक समजले जाऊ लागले. त्याचा परिणाम कवी व तत्सदृश इतर लोक यांच्या-वरही नैतिकदृष्ट्या खूपच झाला.

१९२१ च्या डिसेंबरच्या अखेरीस अहमदाबाद येथे काँग्रेसचे वार्षिक अधिवेशन भरले. त्याचे नियोजित अध्यक्ष श्री चित्तरंजन दास आणि काँग्रेसचे बहुतेक सर्व पुढारी तुरुंगाच्या गजाआड बंदिस्त होते. त्याला एकमात्र अपवाद महात्मा गांधींचा होता. त्यांना युक्तिप्रयुक्तीने मोकळे ठेवण्यात आले होते. कारण त्यांना अटक झाली असती तर लोकांचा राग अनावर होऊन भडकाच उडाला असता. त्यामुळे त्यांना मोकळे ठेवण्यात शहाणपणाच होता, असे नंतरच्या घटनांवरून अनपेक्षितपणे सिद्ध झाले. तथापि १९२१ मालच्या त्या कालखंडात कवी आणि इतर लोक श्वास रोधून प्रतीक्षा करीत राहिले. अहमदाबादला स्वराज्याची घोषणा व्हावयाची होती. तेथील तंग वातावरणात प्रतिनिधी जमले आणि विखुरले. १९२२ साल उजाडता-उजाडता राष्ट्रीय संघर्षातील निर्णायक पाऊल उचलले जाईल असा विश्वास लोकांना वाटत होता. त्या आंदोलनातून अखेर करबंदीची चळवळ सुरू होईल आणि आश्वासित स्वराज्याची शांततापूर्ण चळवळ

साकार होईल अशी अपेक्षा होती. गांधीजी हे राष्ट्राचे पुढारी होते. त्यांच्या नेतृत्वाखाली ही चळवळ कोणत्याही क्षणी सुरू होईल, अशी लक्षणे दिसत होती.

१९२१–२२ साली नजरुल यांचे जीवन व कार्य यांची किमान पार्श्वभूमी समजून घेण्यासाठी या संदर्भात एवढेच सांगितले म्हणजे पुरे की, गांधीजींच्या नेतृत्वाखालील चळवळीचा तो क्षण आलाच नाही. लोकक्षोभ आणि जोष यांनी तो बंधारा आधीच उडवून लावला. १९२२ च्या जानेवारीत उत्तर प्रदेशातील चौरीचौरा या गावी एक हिंसक उद्रेक घडून आला. गांधीजींच्या दृष्टीने तो धोक्याचा इषारा होता. जनतेने अहिंसेचा पाठ आत्मसात् केला नसल्याची ती खूण होती. मुळीच विलंब न लावता १९२२ च्या फेब्रुवारीत बार्डोली (गुजरात) येथे काँग्रेसच्या कार्यसमितीची बैठक बोलावण्यात आली; आणि गांधीजींच्या मार्गदर्शनाने बार्डोली ठराव पास करण्यात आला. त्या ठरावानुसार सबंध देशभर चालू असलेले आंदोलन मागे घेण्यात आले; आणि काँग्रेसजनांना विधायक कार्य हाती घेण्यास सांगण्यात आले. सूतकताई, विणाई, ग्रामोद्धार, हिंदु-मुस्लिम ऐक्य वगैरे गोष्टींचा या विधायक कार्यात समावेश होता. नंतर अस्पृश्यता-निवारणाचा कार्यक्रमही त्यात जोडण्यात आला. त्या ठरावाबरोबर 'प्रत्यक्ष कृती'च्या कार्यक्रमासह स्वराज्यप्राप्तीसाठी सुरू करण्यात आलेल्या गांधीवादी संघर्षाचा पहिला टप्पा समाप्त झाला. 'प्रत्यक्ष कृती'चा दुसरा टप्पा १९३० साली मिठाचा सत्याग्रह व सविनय कायदेभंग यांच्या स्वरूपात सुरू व्हावयाचा होता. या मध्यंतरीच्या काळात गांधीजींचा तुरुंगवास आणि चित्तरंजनदास व मोतीलाल नेहरू यांच्या नेतृत्वाखालील स्वराज्य पक्षाचा संसदीय लढा चालत राहिला. नजरुल यांच्या दृष्टीने विद्रोह व जनतेचे पुनरुत्थान यांचा कवी म्हणून, उल्केप्रमाणे उदय व क्षेप दर्शविणारा हा कालखंड ठरला.

## प्रकरण : तिसरे

# विद्रोही कवी

आपण मागील प्रकरणात पाहिल्याप्रमाणे 'स्वराज्याचे वर्ष' १९२१ च्या नोव्हेंबर-डिसेंबरमध्ये शिगेला पोचले होते. बंगालमध्ये चित्तरंजन दासांना १० डिसेंबर रोजी तुरुंगात डांबण्यात आले. त्याच पद्धतीने काँग्रेसचे बहुतेक सर्व पुढारी व चळवळीत भाग घेणारे कार्यकर्ते यांना गजाआड करण्यात आले. देशबंधूंचे 'बांगलार कथा' हे साप्ताहिक वासंतीदेवी यांच्या स्वाधीन करण्यात आले होते. देशबंधू, वासंतीदेवी व त्यांच्या अवतीभोवती असलेले इतर राजकीय लोक नव्या युगाचा नवा कवी म्हणून काजी नजरुल इस्लाम यांना चाहात होते; त्यांचे कौतुक करीत होते. खुद्द रवीन्द्रनाथही स्वदेशी युगाचे कवी बनले होते. जोपर्यंत एखाद्या चळवळीला तिचा स्वतःचा असा कवी लाभत नाही, तोपर्यंत बंगाली माणसाला बरे वाटत नाही. त्याप्रमाणे वासंतीदेवींच्या मनात नजरुलचा विचार आला; आणि त्यांनी 'बांगलार कथा'साठी लेखन करावे अशी त्यांना त्यांनी विनंती केली. नजरुल यांनी आनंदाने ती विनंती मान्य केली. ते स्वतः देशबंधूंचे प्रशंसक होते. अधिकांश बंगाल्यांप्रमाणे चित्तरंजनबाबूंचा प्रांजलपणा आणि देशासाठी त्यांनी केलेला त्याग याबद्दल त्यांच्या अंतःकरणात आदराची भावना होती, म्हणून त्यांनी 'बांगलार कथा'साठी 'भांगार गान' (विध्वंसाचे गीत) हे गीत लिहिले. स्वातंत्र्य आंदोलनात लिहिल्या गेलेल्या अमर गीतांपैकी ते एक समजले जाते. त्या काळातील लढाऊ मनोवृत्ती त्यामध्ये प्रतिबिंबित झाली आहे.

कारार ओइ लौह कपाट
भेंगे फेल कर-रे लोपाट
रक्त-जमात
सिकल-पुजार पाषाण-वेदी...

(त्या कारागृहाचा तो लोखंडी दरवाजा तोडून टाक. शृंखलांच्या देवतेची

पूजा करण्यासाठी उभारलेली ती रक्ताने माखलेली पाषाण-वेदी उद्ध्वस्त करून टाक, नामशेष करून टाक. )

राष्ट्रीय चळवळीतील हे पहिलेच महान गीत होते. जुन्या काळातील स्वदेशी आंदोलनाशी संबंधित गीतांपेक्षा ते अधिक जोरदार व उग्र होते. भावी काळात नजरुल यांच्याकडून जी आणखी काही तेजस्वी गीते मिळणार होती त्यांचे अग्रदूत म्हणूनच जणू हे गीत अवतरले होते. त्याची चाल, शब्दरचना आणि आवाहन–सामर्थ्य या दृष्टींनी लोकांना कृती करण्यास प्रेरणा देण्याचा अद्भुत प्रभाव त्यामध्ये होता. स्वाभाविकपणेच त्याच्यावर बंदी घालण्याचा प्रयत्न झाला. परंतु अगदी थेट १९४७ पर्यंत राष्ट्रीय संघर्षाच्या काळात हे गीत हजारो व्यासपीठांवरून लोकांनी गायिले. येथे आणखी एका घटनेचा उल्लेख केला पाहिजे. वासंतीदेवींनी नजरुल यांना लागलीच आपल्या घरी बोलावले; आणि दास कुटुंबाचा प्रख्यात पाहुणचार तर त्यांना दिलाच; परंतु त्यांना तोंड भरून प्रेमळ आशीर्वादही त्यांनी दिला. त्या आशीर्वादाचा विसर नजरुल यांना पडला नाही, असे त्यांच्या ' चित्त-नामा ' ( चित्तपुराण ) या पुस्तकावरून दिसून येते.

१९२१ सालाचे शेवटचे दिवस विद्युत-प्रवाहाने भारलेले आणि नजरुल यांच्यासारख्या माणसाला अगदी हवे-हवेसे वाटणारे—राष्ट्रीय चैतन्याला उधान आणणारे—होते. त्यामुळे १९२१ डिसेंबरच्या शेवटच्या आठवड्यात नजरुल यांचे मित्र व त्यांच्याच खोलीत राहणारे मुजफ्फर अहमद यांच्या म्हणण्याप्रमाणे, एके दिवशी मध्यरात्र उलटून गेल्यावर नजरुल शिसपेन्सिलीने काहीतरी लिखाण करण्यात गढून गेले होते. ते बहुधा एक कविता लिहीत असावेत. आणि ती कविता चांगलीच दीर्घ असावी. दुसऱ्या दिवशी सकाळी नजरुल यांनी जी पहिली गोष्ट केली ती म्हणजे आपल्या या मित्राला त्यांनी आपली ती कविता वाचून दाखविली. ती कविता होती ' विद्रोही ' ( बंडखोर ).

बलो बीर

बलो उन्नत मम शिर

( हे वीरा, तू बोल. तू असे ठासून सांग की माझे शिर उन्नत आहे. )

अशा त्या पंक्तीमागून पंक्ती बाहेर पडू लागल्या. अविस्मरणीय काव्यपंक्ती. आपण काहीतरी भव्यदिव्य, अद्वितीय काव्य रचले आहे, याविषयी नजरुल यांना खात्री वाटत होती. त्या काव्याचे प्रकाशन होणारच होते. त्यात कसलीही शंका नव्हती. मात्र वेळ वाया जावयास नको होता. ' मुस्लिम भारत ' हे त्यांचेच मुखपत्र असल्याने त्याचा त्यावर पहिला हक्क होता. परंतु दुर्दैवाने ते मासिक होते; आणि त्याचे प्रकाशन फारसे नियमितही नव्हते. त्यात ही कविता छापावयाची म्हणजे विलंब झाला असता. परंतु त्याला कोणीच तयार नव्हते. कवी किंवा त्यांचे मित्र यांना विलंब नको होता. अखेर असे ठरले की ' मुस्लिम

भारत ' ने आपल्या सवडीप्रमाणे ते काव्य छापावे (त्याप्रमाणे त्याने ते नंतर छापलेही). दरम्यान बारींद्रकुमार घोष यांच्या 'बिजली' या साप्ताहिकाने कवीकडे या काव्याची मागणी केली; आणि नजरुल यांची 'विद्रोही' ही कविता सर्वांत प्रथम प्रकाशित करण्याचा मान 'बिजली'ला मिळाला (२२ पौष, १३२८ बंगाब्द; ६ जानेवारी १९२२). बंगाली वाचकांमध्ये त्या कवितेने प्रचंड खळबळ उडवून दिली. त्या कवितेची मागणी पुरी करण्यासाठी 'बिजली'च्या अंकाचे पुनर्मुद्रण करावे लागले. असे सांगतात की 'बिजली'ची प्रत हातात पडताच नजरुल धावतच जोड़ासांको या टागोरांच्या निवासस्थानी रवींद्रनाथांकडे गेले आणि त्यांनी आपल्या 'गुरुजीं'ना आपल्या नेहमीच्या उल्हासाने ती कविता वाचून दाखविली. ती ऐकून गुरुदेव अगदी भारावून गेले. त्यांनी नजरुल यांना आशीर्वाद दिला; आणि त्यांच्या भावी जीवनाविषयी शुभेच्छा व्यक्त केल्या.* ते कसेही असले तरी 'विद्रोही' कविता प्रसिद्ध झाल्यानंतर नजरुल एका रात्रीत प्रख्यात झाले, यात मुळीच शंका नाही.

'विद्रोही' ही निश्चितच एक उत्कृष्ट कविता आहे; परंतु ती निर्दोष आहे असे मात्र म्हणता येत नाही. त्यावेळी त्या कवितेच्या रसज्ञ वाचकांनाही तसे वाटले होते; आणि आजही नजरुलचे चाहते ते मान्य करतात. परंतु कवितेतील दोष सहजासहजी लक्षात येण्यासारखे नव्हते. त्यांना फारसे महत्त्व नव्हते. कारण बंगालच्या साहित्यिक व राजकीय जीवनात ती एक महत्त्वाची 'घटना' होती. त्या काळाचे पुनःस्मरण केल्यास असे दिसून येईल की त्या जीवनाच्या पार्श्वभूमीवर बंडखोरपणाचे वातावरण होते. त्यामुळे लोक ज्या कवितेची प्रतीक्षा करीत होते तीच 'विद्रोही'च्या रूपाने प्रकट झाली होती; आणि ती कविता लिहिण्यास नजरुल हेच योग्य कवी व व्यक्ती होते. ते स्वतःही त्याच मनःस्थितीत होते—बंडखोर, सारी बंधने तोडून टाकण्यास अधीर, राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठी अस्वस्थ आणि आत्माभिव्यक्तीचे स्वातंत्र्य, संताप व सौंदर्य यांच्या माध्यमातून आत्मविस्तार लाभावा म्हणून बेचैन झालेले. वैयक्तिक व राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या मनोभावनांचा ज्या ठिकाणी संगम होतो अशा मानवी अधिकारांच्या उत्कट अभिलाषेची त्यांना अंधुक जाणीव होती. परंतु तिचे सुस्पष्ट बौद्धिक आकलन मात्र त्यांना नव्हते किंवा लोकांमध्येही ते आकलन अधिक चांगल्या प्रकारे

---

* ही घटना खरी असलीच तर तिच्यात तारखेचा गोंधळ असल्याचे स्पष्ट दिसून येते. कारण त्यावर्षी रवींद्रनाथ २१ पौष, ४ जानेवारी १९२२ रोजी शांतिनिकेतनला परत गेले होते, आणि तेथे 'मुक्तधारा' हे नाटक लिहिण्यात गुंतले होते असे दिसते. नजरुल टागोरांना भेटले होते व त्यांना त्यांचे आशीर्वाद मिळाले होते, यात शंका नाही. परंतु त्यांची ही भेट वरील तारखेला किंवा या प्रसंगाच्या संदर्भात झाली नसावी, हे उघड आहे. (पाहा : प्रभातकुमार मुखोपाध्याय, 'रवींद्रजीवनी' खंड ३, पृ. ९१; १३५९ बंगाब्द; मुजफ्फर अहमद, 'स्मृतिकथा', पृ. २३८)

विद्यमान नव्हते. सर्वजण बौद्धिक गोंधळाच्या गूढवादात गुरफटले होते. परंतु त्याचबरोबर हेही कबूल केले पाहिजे की त्यांच्यावर मूलतः एका निकोप आदर्शाचा व प्रांजळ भावनात्मक उद्रेकाचा पगडा होता. तो आदर्श व उद्रेक होताः काहीही करून स्वराज्य मिळविणे. 'विद्रोही' ही कविता कोणत्याही व्याख्येत बसणारी नसली तरी ती जनतेची कविता होती आणि नजरुल हे तिचे कवी होते. सर्वांत महत्त्वाची गोष्ट अशी की या कवितेमुळे नजरुल यांना आत्माभिव्यक्तीचा मार्ग मोकळा झाला.

बंगालच्या लोकांना त्यांचा कवी मिळाला; परंतु या साऱ्या प्रकरणात स्वतः कवी मात्र एका मित्राला गमावून बसला. ती हकीगत या ठिकाणी नमूद करण्यास हरकत नाही.

मोहितलाल मजुमदार 'विद्रोही' कविता वाचून संतापले. त्यांच्या म्हणण्यानुसार 'विद्रोही' हा निव्वळ वाङ्मय-चौर्याचा एक प्रकार होता. त्यांनी आपले प्रिय कनिष्ठ मित्र नजरुल यांना 'आमि' (मी) हा आपला गद्यलेख पूर्वी वाचून दाखविला होता. त्यावरूनच नजरुल यांनी 'विद्रोही' ही कविता रचली होती, असा त्यांचा आरोप होता. मोहितलाल यांचे म्हणणे बरोबर होते, असे मान्य करूनही या ठिकाणी हे सांगितले पाहिजे की त्यांची तक्रार मात्र खरोखरी काल्पनिक होती. मोहितलालांनी आपली गद्यकृती 'आमि' नजरुलना वाचून दाखविली होती, आणि नजरुल तिने भारावून गेले होते असे गृहीत धरले तरी—याबाबतीत अविश्वास बाळगण्याचे आपल्याला कारण नाही—त्यांचा गद्यलेख व नजरुलची कविता यामध्ये विषय व रूप यांच्या बाबतीत खूपच फरक आहे. गद्य रचना आणि पद्य रचना यांतील ढोबळ फरक बाजूला ठेवला, आणि अभिव्यक्तीचा खास नजरुली ढंग—हा ढंग काही बाबतीत परिपक्व नव्हता, हे आपण जाणतोच—व मोहितलालांची खास शैली, यांतील वेगळेपणा नजरेआड केला, तरी त्या दोन रचनांमधील आशयच मुळात भिन्न होता. 'आमि' ही रचना मूलतः अद्वैत वेदांताच्या किंवा एकतत्त्ववादाच्या 'अहम्' या संकल्पनेवर आधारलेली होती, तर नजरुल यांची कविता बंडखोर 'मी' ची अभिव्यक्ती करणारी होती. हा 'मी' साऱ्या भौतिक बंधनांविरुद्ध बंड करून उठलेला आहे. मात्र त्याचे हे बंड जीवन व प्रेम यांच्यासाठी, सौंदर्य व सत्य यांच्या बाजूने उभारलेले आहे. पहिल्यातील 'अहम्' हा सर्वसाक्षी परंतु आत्मनिष्ठ होता; तर दुसऱ्यातील 'मी' आत्मप्राधान्यावर जोर देणारा आणि आत्मनिष्ठापेक्षा अधिक वस्तुनिष्ठ होता. *

---

*कविवर्य मोहितलाल मजुमदार यांच्या सचोटीविषयी माझ्या मनात अत्यंत आदर आहे. मी प्रत्यक्ष त्यांच्याकडून या संबंधात असे ऐकले आहे की, त्यांची 'आमि'

(पान २८ पाहा)

व्याख्येचा किंवा निश्चितपणाचा अभाव, किंबहुना विचारातील असंबद्धता हे 'विद्रोही'चे खास वैशिष्ट्य होते. याचे कारण बहुधा हे असावे की नजरुल यांच्या अंतर्मनावर वेदान्ती 'आमि'चे जे धुके पसरले होते ते रेंगाळत राहिले होते. ते कसेही असले तरी मोहितलालना या घटनेशी जुळवून घेता आले नाही, एवढे खरे. खरे म्हणजे, असे घडण्यास मोहितलाल यांच्या दृष्टीने अधिक सखोल कारणे होती. त्या दोन व्यक्तित्वांमध्ये संघर्ष होणे अटळ होते, असे जे मुजफ्फर अहमद् म्हणतात ते बरोबर आहे. मोहितलाल यांच्यातील अहंतेमुळे, दुर्दैवाने, नजरुल हे आपले पाल्य किंवा चेलेच राहावेत असा त्यांनी प्रयत्न केला. परंतु नजरुल स्वभावतःच कुणाचेही पालकत्व सहन करणारे नव्हते. सर्व लहानथोर मंडळींशी ते मोकळेपणाने व हेतुपरस्पर मित्रत्वाच्या भावनेने वागत. त्यांच्या वागण्याने मोहितलाल दुरावले. विभिन्न प्रकारच्या व्यक्तित्वांमधील तो अटळ असा संघर्ष होता. त्यामुळे सुमारे दोन वर्षांनंतर (१९२४ साली) नजरुल आपल्या लोकप्रियतेच्या ऐन भरात असताना लेखकांच्या 'कल्लोल' गटाने जेव्हा बंगाली शिक्षित वर्गाचे विद्यमान मापदंड आणि नैतिक मूल्ये यांना सळसळत्या तारुण्याने युक्त असे आव्हान दिले तेव्हा स्थूलपणे, आणि चुकीनेही, नजरुल हे त्या बंडखोर गटाचे पुढारी समजले गेले. या आव्हानाविरुद्ध वैयक्तिक स्वातंत्र्याला विरोध असणाऱ्या साहित्यिकांच्या दुसऱ्या गटाने (शनिवारेर चिठी-गटाने) आपला बडगा उगारला. मोहितलाल हे या गटाचे सैद्धांतिक प्रवक्ते होते. परंतु 'विद्रोही'चे विडंबनकाव्य त्यांनीच लिहिले असावे, असा मात्र अनेकांचा उगाचच गैरसमज झाला होता. (वस्तुतः ते विडंबनकाव्य सजनीकांत दास यांनी लिहिले होते.) नजरुल खवळून उठले आणि त्यांनी मोहितलालांवर आरोप करणारी 'सर्वनाशेर घंटा' ही कविता लिहिली. तिला उत्तर म्हणून मोहितलाल यांनी उघडपणे 'द्रोण-गुरु' या कवितेच्या रूपाने नजरुल यांच्यावर आपला जोरदार सोटा उगारला. त्या कवितेत त्यांच्या तोंडी त्यांनी भयंकर शिव्याशाप घातले होते. शिवीगाळीचा तो एक इरसाल नमुना आहे. नजरुल यांच्या कवितेत क्रोधापेक्षा दुःख अधिक होते. तिच्यात आरडाओरडाही नव्हता अथवा फारशी तीक्ष्णताही नव्हती. ज्येष्ठ कविवर्यांप्रमाणे नजरुल त्या प्रकरणात त्यानंतर गुरफटून

(पान २७ वरून)

ही कृती (जी 'मानसी' मासिकात प्रसिद्ध झाली होती) कलकत्त्याच्या रिपन कॉलेजातील माजी प्राध्यापक क्षेत्रमोहन बंद्योपाध्याय यांच्या 'अभयेर कथा' अथवा 'टाकुराणीर कथा' मधील एका प्रसंगावरून त्यांना स्फुरली होती. ही दोन्ही पुस्तके आता दुर्दैवाने विस्मृतीत गडप झाली असली तरी वाचनीय आहेत. मोहितलालांना त्यातील परिच्छेद वाचून दाखविण्याचा नाद होता. ती पुस्तके वाचल्यानंतर 'आमि' हा अद्वैत अहम्‌चा पूर्णपणे प्रतिध्वनी होता याविषयी आपल्या मनात शंका उरत नाही.

राहिले नाहीत, हे बरे झाले. अशा प्रकारे जेथवर नजरुल यांचा संबंध होता तेथवर 'आमि' विरुद्ध 'विद्रोही' या प्रकरणाचा तेथेच शेवट झाला. एका अर्थाने मोहितलाल यांच्या म्हणण्याची लोकांनी त्यापूर्वी कधीच उपेक्षा केली होती, आणि मुख्य म्हणजे बंगाली साहित्य जगतातील नेत्यांनी त्यांचा दावा पूर्वीच फेटाळून लावला होता. त्यामुळे पुढे १९२३ साली रवींद्रनाथांनी आपले 'वसंत' हे गीतनाट्य नजरुल इस्लाम यांना अर्पण केले ( १० फाल्गुन १३२९ बंगाब्द; २४ फेब्रुवारी १९२३ ) तेव्हा बंगाली जनतेला पूर्ण समाधान लाभले; आणि खुद्द कवीलाही मोहितलाल यांच्या आरोपाची फारशी पर्वा वाटली नसावी, असे दिसते.

'विद्रोही' कविता प्रसिद्ध झाल्यापासून नजरुल इस्लाम हे 'विद्रोही कवी' या टोपणनावाने ओळखले जाऊ लागले. नजरुल यांच्या काव्यजीवनाच्या पहिल्या टप्प्याचे–तिसऱ्या दशकाचे–यथार्थ वर्णन या शब्दांनी होते. परंतु त्यांच्या काव्यजीवनाचे आणखीही टप्पे होते, त्यांच्या बाह्य व आंतरजीवनाच्या तितक्याच सुनिश्चित अशा इतर बाजू होत्या, त्यांच्या आत्माभिव्यक्तीचे केवळ बंडखोर आत्मनिष्ठेपेक्षा इतरही मार्ग होते; आणि हे सारे त्यांच्या पहिल्या टप्प्यातही दृग्गोचर झाले होते. या कवितेमध्ये मानवाला आणि त्या काळाला एक सूचक, महत्त्वपूर्ण उद्गार लाभला होता. तो काही अकस्मात् झालेला स्फोट नव्हता. नजरुल सुरुवातीपासूनच कवचकुंडले परिधान केलेले कवी होते. त्या काळात प्रभावशाली असलेल्या भाववृत्तीतून त्यांनी काही कविता लिहिल्या. त्यांमध्ये कमालपाशाचा जयघोष करणाऱ्या जोरदार कविता होत्या आणि ईजिप्तचा झगलुल पाशा याच्या स्तुतिपरही कविता होत्या. ( गमतीची गोष्ट अशी की कमालचा प्रतिस्पर्धी अन्वर पाशा हा त्याचा सहकारी योद्धा असल्याची कल्पना कवीने केली आहे. ) भारतातील राष्ट्रीय आंदोलनाशी संबंधित घटनां-विषयी–अली बंधूंचा कारावास आणि गांधीजींच्या नेतृत्वाखालील काँग्रेसची चळवळ यांविषयीही त्यांनी कविता लिहिल्या. आपल्या अधिकांश बंगाली बांधवांप्रमाणे नजरुल हेही महात्माजींचे अंध अनुयायी नव्हते. परंतु त्यांच्या-प्रमाणेच अहिंसा व सत्याग्रह या उच्च आदर्शांचे ते चहाते होते; आणि ते आदर्श अव्यवहार्य आहेत, असे त्यांचे मत होते. मात्र सुरुवातीला त्यांनी गांधीजींचे नेतृत्व मनःपूर्वक स्वीकारले होते; कारण राष्ट्रीय स्वातंत्र्य, आम जनतेचा सहभाग व प्रत्यक्ष कृती यांवर त्या नेतृत्वाची उभारणी झालेली होती. त्यांनी कोमिल्ला येथे असताना १९२१ साली गांधीजींवर कविता लिहिल्या होत्या. त्यांमध्ये स्वातंत्र्य युद्धातील गांधीजींच्या आगमनाबद्दल खुल्या अंतःकरणाने त्यांनी जयघोष केला होता.

"ए कोन पागल पथिक छुटे एलो बंदिनी मार आंगिनाय!
त्रिश कोटि भाइ मरण हरण गान गेये तार संगेय जाय"

(बंदिनी मातेच्या आंगणात हा कोण वेडा पथिक धावून आला आहे! तीस कोटी बांधव मृत्यूला आव्हान देणारे गीत गात त्याच्याबरोबर चालले आहेत.)

अशी कडव्यांमागून कडवी मुक्तकंठाने, अस्खलितपणे त्यांनी गायिली. हे तर नजरुलचे वैशिष्ट्यच होते. याचप्रमाणे त्यांनी चरख्यावरही एक उत्कृष्ट कविता लिहिली आहे. अर्थात् चरखा हा त्यांच्या दृष्टीने राष्ट्रीय आव्हानाचे केवळ एक प्रतीक होते. त्याहून दुसरा काही अर्थ त्यांना त्यात अभिप्रेत नसावा. गांधीजींशी संबंधित या विशिष्ट प्रकारच्या कवितांखेरीज नजरुल हे आपले देशप्रेम, स्वातंत्र्य-प्रेम, आणि असहकारातून प्रस्फुरित झालेल्या राष्ट्रीय चळवळीविषयीचे प्रेम मनःपूर्वकतेने व्यक्त करणाऱ्या अनेक कविताही या काळात लिहीत होते. काही काळपर्यंत ते स्वातंत्र्य–आंदोलनाशी एकरूप होऊन गेले होते. नजरुल यांच्या त्या काळातील अशा प्रकारच्या कविता व इतर लिखाण यांमधून त्या चळवळीच्या उग्रतेची आजही कल्पना येऊ शकते.

परंतु या काळात नजरुल अष्टौप्रहर फक्त याच प्रकारच्या कविता लिहीत होते, असे नाही. त्यांचे अंतःकरण खुले होते, ते तडफदार होते, आणि डोळ्यांना व कानांना, मनाला व हृदयाला नानाविध प्रकारांनी आकर्षून घेणाऱ्या बहुरंगी जीवनाला प्रतिसाद देणारे होते. आपल्या सर्जनशील कर्तृत्वाच्या कोणत्याही टप्प्यामध्ये त्यांच्यात वैविध्याचा अभाव कधीच नव्हता. त्यामुळे १९२२ साली 'भांगार गान' यांसारख्या गीतांव्यतिरिक्त त्यांनी वैयक्तिक भावनांची अभि-व्यक्ती करणाऱ्या काही सुंदर कविता व गाणी लिहिली होती असे दिसते. त्यांमध्ये स्त्रीसुलभ डौल आणि भावनांचा पौरुषयुक्त स्वीकार यांचा मधुर संगम झालेला आहे. त्या सर्वांचा पुढे 'दोलन चंपा' (१९२३), 'छाया-नट' (१९२४) व 'पुबेर हवा' ह्या त्यांच्या प्रेमगीत संग्रहात समावेश करण्यात आला. परंतु तारखा आणि घटना यांच्यात गोंधळ होऊ नये यासाठी येथे हे लक्षात ठेवले पाहिजे की ही पुस्तके वस्तुतः नंतरच प्रकाशित व्हावयाची होती; आणि खरे म्हणजे, १९२१ पर्यंत नजरुल यांचा एकही कवितासंग्रह अथवा गीतसंग्रह प्रसिद्ध झालेला नव्हता. त्यांची जी पहिली वहिली पुस्तके १९२२ साली छापखान्यात होती ती अशी : पूर्वी ज्याचा उल्लेख आला आहे तो त्यांचा 'व्यथार दान' हा कथासंग्रह बऱ्याच महिन्यांपासून छापखान्यात पडून होता. तो अखेर मार्च १९२२ मध्ये प्रकाशित झाला. 'नवयुग' मधील त्यांच्या लेखांचा एक संग्रह १९२२ च्या ऑक्टोबरात 'युग-वाणी' या शीर्षकाने (लौकरच जप्त होण्यासाठी!) प्रसिद्ध झाला. आणि अखेर त्या वर्षीच्या त्याच महिन्यात 'अग्नि-वीणा' हा जळजळीत

कवितांचा संग्रह प्रसिद्ध झाला. या काव्यसंग्रहापासून कवीला कसलीही आर्थिक प्राप्ती होत नसली तरी अजूनही तो हजारांच्या संख्येने खपत असतो. या संग्रहाची इतरही संस्मरणीय वैशिष्ट्ये आहेत. त्यांचा उल्लेख करणे उचित ठरेल.

'अग्नि-वीणा' हा काव्यसंग्रह बंगालच्या 'अग्नि-युगा'चे म्हणजे १९००–१९०८ या कालखंडातील पहिल्या क्रांतिकारक चळवळीचे आद्यप्रवर्तक क्रांतिकारक बारींद्रकुमार घोष यांना समर्पित करण्यात आला होता. या संग्रहाचे आवरण-पृष्ठ प्रख्यात कलामहर्षी अवनींद्रनाथ टागोर यांनी तयार केले होते. कोणाही लेखकाला क्वचितच मिळणारा असा हा बहुमान होता. याचा अर्थ असा की नजरुल यांनी सामान्य जनतेप्रमाणे टागोर मंडळींचीही हृदये एव्हाना जिंकली होती. या संग्रहाचे अभूतपूर्व स्वागत झाले; आणि ३–४ महिन्यांतच त्याची दुसरी आवृत्ती निघाली (फेब्रुवारी १९२३). या सर्व गोष्टींमुळे नजरुल यांना थोडीफार अर्थप्राप्तीही झाली; आणि त्यांनी आपल्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे तिचा पुरेपूर फायदा घेण्यास मुळीच मागेपुढे पाहिले नाही. उद्याची फिकीर न करिता त्यांनी मित्रांसह तो सारा पैसा मौज-मजा करण्यात व मेजवान्यांमध्ये उडवून टाकला.

१९२२ च्या उत्तरार्धात नजरुल यांची पुस्तके प्रसिद्ध होत असताना ते अत्यंत उत्साही मनःस्थितीत होते. कारण त्यांनी बऱ्याच वर्षांपासून उराशी बाळगलेले, स्वतःचे नियतकालिक काढण्याचे स्वप्न साकार होण्याची चिन्हे दिसू लागली होती. ते नियतकालिक म्हणजे प्रख्यात साप्ताहिक 'धुमकेतू' हे होय.

त्या आधी ते कोमिल्लाला जाऊन आले होते. अलीकडे त्यांचे कोमिल्लाला जाणे-येणे बरेच वाढले होते. तेथील सेनगुप्त कुटुंबामध्ये त्यांना आपले स्वतःचे घरच जणू मिळाले होते, आणि त्यांच्यामध्ये ज्या मायाळू सहजपणाची उणीव होती तीही त्या मंडळींनी भरून काढली होती. तथापि त्यांना 'सेवक' या नवीन दैनिकात काम करण्यासाठी कलकत्त्याला परत बोलावण्यात आले. (मे अथवा जून १९२२). हे दैनिक मुख्यों राष्ट्रीय पत्रकार मौलाना एम्. अक्रम खान यांनी सुरू केले होते (कालांतराने हे गृहस्थ १९३० ते १९४८ च्या दरम्यान बंगालमधील मुस्लीम लीगचे 'प्रेस लॉर्ड' (वृत्तपत्रीय दादा) बनले; आणि स्वाभाविकपणेच देशाच्या फाळणीनंतर ते ढाक्याला स्थलांतरित झाले.) नजरुल यांनी 'सेवक' मध्ये सुमारे दोन महिने काम केले. त्यानंतर एका मित्राने त्यांना केवळ २०० रुपये उसनवार दिले, आणि तेवढ्या आधारावर त्यांनी आपले स्वतःचे नियतकालिक काढण्याचा निर्णय घेतला. त्या नियतकालिकाचे नाव त्यांनी 'धूमकेतू' असे ठेवले. दर आठवड्याला त्याचे दोन अंक निघावयाचे होते.

'धूमकेतू' चा पहिला अंक १२ ऑगस्ट १९२२ रोजी निघाला. त्याला रवींद्रनाथ टागोर, शरदचंद्र चट्टोपाध्याय, बारींद्रकुमार घोष आणि काही इतर

लोक यांचे आशीर्वाद लाभले होते. टागोरांच्या संदेशातील अंतिम पद्यपंक्ती मोठ्या अर्थपूर्ण होत्या.

जागिये दे रे चमक मेरे
आछे जारा अर्ध-चेतन।

(जे अजून अर्धवट जागृतावस्थेत आहेत त्यांना तू प्रकाशझोत टाकून जागे कर.)

खरोखरी, हेच त्या पत्राचे उद्दिष्ट होते; आणि त्या काळातील नजरुलच्या साहित्याचे मुख्य तत्त्व होते–लोकांना जागे करणे, जीवनाच्या वास्तवतांचे आव्हान टाळण्याचा किंवा पलायनवादाचा प्रयत्न करू इच्छिणाऱ्यांना गदगदा हालवून जागृत करणे. 'धूमकेतू' च्या प्रकाशनाने हा विद्रोही कवी प्रत्यक्ष वादळाच्या दिशेने वाटचाल करू लागला. नजरुल यांना काही राजकीय महत्त्वाकांक्षा होत्या अथवा त्यांच्या जवळ भक्कम, सुस्पष्ट आदर्श होता, अशातली गोष्ट नव्हती. पण लेखक या नात्याने त्यांनी 'बांधीलकी' स्वीकारली होती. असे करण्यात त्यांनी फारसा शहाणपणा दाखविला असेही म्हणता येत नाही. कारण नजरुल हे स्वभावतःच उतावळे व अदूरदर्शी होते. आणि 'धूमकेतू' हा याबाबतीत आपल्या जन्मदात्याहून मुळीच वेगळा नव्हता. तो नजरुलसारखाच बांधील, उतावळा व अदूरदर्शी किंवा उद्धट होता. याशिवाय आणखीही काही त्यात होते. कवी नजरुलपेक्षा गद्यलेखक नजरुल दोन पावले पुढे होते. ते हृदयस्पर्शी, जळजळीत गद्य लिहीत होते, ते लढाऊ होते आणि क्रांतिकारक आव्हान देणारे लेखक होते. अर्थात् काळाला त्यांच्याकडून या साऱ्या गोष्टींची निःसंशय अपेक्षा होती, हेही आपण समजून घेतले पाहिजे.

तो १९२२ सालचा ऑगस्ट महिना होता; आणि बार्डोलीच्या ठरावानंतर जनतेचा जो उत्साहभंग झाला होता तो काँग्रेसच्या कार्यक्रमातील चरखा वगैरे गोष्टींनी भरून येण्यासारखा नव्हता, हे उघड आहे. 'आता पुढे काय ?' हा अस्वस्थ करून सोडणारा प्रश्न चोहोबाजूंनी विचारला जात होता. अहिंसा व चरखा यांना जे इतर पर्याय होते त्यांपैकी पहिला असा की आयर्लंड व सिनफेनचा राष्ट्रवादी-दहशतवादी मार्ग स्वीकारावयाचा. बंगालमधील पूर्वीच्या क्रांतिकारक दहशतवाद्यांना या मार्गाने आकर्षित केले होते. दुसरा मार्ग लेनिनने दाखवून दिलेल्या जनआंदोलनाचा व क्रांतीचा होता. बहुसंख्य उत्सुक राजनीतिज्ञ या मार्गाचे प्रथम पुरस्कर्ते बनले. ऑक्टोबर क्रांतीचे स्वेच्छेने संदेशवाहक बनलेल्या स्वातंत्र्यप्रेमी मंडळींच्या या नव्या पथकाला मार्क्सवादी-लेनिनवादी मार्गाचे पूर्ण आकलन झाले होते, अशातला भाग नाही. या विषयासंबंधीचे साहित्य एव्हाना भारतात क्वचित्‌च उपलब्ध होत होते; आणि एम्. एन्. रॉय यांचे 'व्हॅंगार्ड' व गया काँग्रेस (डिसेंबर १९२२) च्या वेळी

भारतीय साम्यवाद्यांनी राष्ट्रीय लोकशाही क्रांतीच्या आपल्या कार्यक्रमाला प्रसिद्धी देण्याचे केलेले प्रयत्न जमेस धरूनही त्यावेळची परिस्थिती अशी होती की कॉमिन्टर्न हे नुसते एक नाव होते आणि साम्यवाद ( कम्युनिझम ) ही केवळ मूठभर लोकांची एक भावनात्मक वृत्ती होती. निःस्वार्थपणा किंवा परोपकारवाद हीच त्यामागील मुख्य प्रेरक शक्ती होती. परंतु मुजफ्फर अहमद यांनी यापूर्वीच त्या मार्गाची ' बांधिलकी ' स्वीकारली होती; आणि नजरुल हे त्यांचे अत्यंत जवळचे मित्र होते. किंबहुना त्या काळात ( १९२१–१९२२ ) नजरुल त्यांचे ' सहप्रवासी ' होते असेही म्हणता येईल. ते कसेही असो. नजरुलच्या दृष्टीने कोणीच ' अस्पृश्य ' नव्हते. राष्ट्रवादी व आंतरराष्ट्रवादी दोघेही त्यांना सारखेच जवळचे होते. आपल्या समर्थकांमध्ये ते ज्यांचा समावेश करीत होते त्यांमध्ये ' बिजली 'चे मरब्बी बारींद्रकुमार घोष व ' आर्य पब्लिशिंग हाऊस'चे ( अरविंद-प्रवर्तकशी संलग्न असलेले ) लोक यांसारख्या जुन्या क्रांतिकारकांपासून अनेक तरुणांपर्यंतचे लोक होते. त्यामुळे मानवी समता व स्वातंत्र्य यांवर आधारलेल्या समाजव्यवस्थेवर ज्वलंत श्रद्धा असलेले नजरुल हे ' जवळ जवळ कम्युनिस्ट ' असले तरी ते दैवी किंवा ईश्वरी सामर्थ्यावर दृढ श्रद्धा बाळगणारे होते व आपली ही श्रद्धा त्यांनी उघडपणे व्यक्तही केलेली होती. ही भावना त्यांच्या काव्यात ओतप्रोत भरलेली होती; आणि त्यांची एकूण उत्क्रांती नजरेसमोर ठेवल्यास तिचा मुद्देसूद खुलासाही करिता येत नव्हता. त्यामुळे नजरुलच्या बंडखोरीच्या टप्प्याचे प्रतिनिधित्व करणारा, आणि त्या काळच्या राजकीय बंडखोरीचे प्रतिबिंब असलेला ' धूमकेतू ' नजरुल यांच्या स्वतःच्या क्रांतिवादाचे प्रतिबिंब बनलेला होता. त्याचा दृष्टिकोण जेवढा राष्ट्रीय होता तेवढाच आंतरराष्ट्रीयही होता. मूलतः त्याने ' स्वातंत्र्य, समता व बंधुता ' यांसाठी लढा उभारला होता; त्यामध्ये नजरुल यांची स्वतःची धर्मनिरपेक्ष वृत्ती आणि देवावरील त्यांची असांप्रदायिक श्रद्धा ही प्रतिबिंबित झाली होती; आणि त्याचवेळी जातिविहीन व वर्गविहीन समाजाविषयी, स्थूल प्रकारच्या साम्यवादाविषयी त्यांना वाटणारे आंतरिक प्रेमही त्यात प्रतिबिंबित झाले होते.

नजरुल यांचे जीवन, मनोभूमिका आणि त्या काळातील त्यांच्या राजकीय कल्पना यांवर प्रकाश टाकण्यासाठी या ठिकाणी त्या कवि-संपादकाची काही निवेदने, स्वतःच्या श्रद्धांविषयी त्यांनी दिलेली स्पष्टीकरणे आणि ' धूमकेतू 'चे उद्देश व हेतू यांतून काही अवतरणे येथे उद्धृत करणे उचित होईल. अर्थात् हे उतारे भाषांतरित असल्याने त्यांचा मुळातील जिवंतपणा व विविधरंगीपणा त्यांत आढळणार नाही, हे स्वाभाविकच आहे.

" मा भैः ( भिऊ नको ) या शब्दांवर विसंबून आणि ' प्रलयंकराचा विजय असो, ' ही घोषणा ओठांवर खेळवीत मी या नव्या मार्गाने प्रस्थान करीत आहे.

'धूमकेतू' हा माझा रथ असून मीच माझा मार्गदर्शक आहे. कोणत्या दिशेने जावयाचे ते मला सत्यच सांगेल ... अशा प्रकारे स्वतःला ओळखणे, आपल्या सत्याला जाणणे, आपणच स्वतःचा गुरू, संचालक व भाग्यविधाता बनणे हा काही पोकळ डौल अथवा फुशारकी नव्हे. त्याचा अर्थ एवढाच की मी मला स्वतःला ओळखले आहे, असे मी जाहीर करू इच्छितो."

या उताऱ्यावरून आपल्याला असे दिसून येते की एकजण आपले ब्रीदवाक्य घोषित करीत आहे. एक व्यक्ती म्हणून जगण्याचा, आपल्या व्यक्तित्वाचे जे सत्य त्याला जाणवले आहे ते व्यक्त करण्याचा आणि ते 'धोकादायक, भयंकर जीवन' जगण्याचा आपला हक्क तो उद्‌घोषित करीत आहे. तरीपण त्यांच्या उद्दिष्टाविषयी अधिक सुनिश्चित निवेदने अथवा विधानेही आपल्याला मिळतात.

> "हा देश अगदी पार किडून-सडून गेला आहे. त्याच्या शरीरातील तो किडलेला-सडलेला भाग पूर्णपणे नाहीसा करून टाकल्याखेरीज नव्या राष्ट्राची उभारणी करिताच येणार नाही. जे कोणी या देशाचे शत्रू असतील त्यांना जाळून भस्मसात् करण्याचे, जे काही असत्य, दंभ व ढोंग असेल त्याचा नायनाट करण्याचे कार्य 'धूमकेतू' करील."

हे आपले उद्दिष्ट त्यांनी वारंवार, अधिकाधिक ठामपणे व्यक्त केले आहे. प्रथम,

> "'धूमकेतू' हे जातीयवादी पत्र नाही. मानवधर्म हा सर्वोच्च धर्मच तो जाणतो. हिंदू-मुस्लिम ऐक्याच्या मार्गात असणारे अडथळे व खोटारड्या गोष्टी दाखवून देणे व त्या नाहीशा करणे हे त्याच्या उद्दिष्टांपैकी एक उद्दिष्ट आहे. ज्याची आपल्या स्वतःच्या धर्मावर श्रद्धा असेल, त्याची नीट ओळख असेल तो कधीही इतरांच्या धर्माचा द्वेष करू शकणार नाही."

'धूमकेतू'च्या दुसऱ्या एका अंकात नजरुल यांनी आपले राजकीय आदर्श स्पष्टपणे मांडण्याचा प्रयत्न केला.

"लोक मला पुनःपुनः विचारतात की, 'धूमकेतू'चा मार्ग कोणता?" पहिला व सर्वात महत्त्वाचा मुद्दा असा की 'धूमकेतू'ला भारताचे संपूर्ण व अविच्छिन्न स्वातंत्र्य हवे आहे. 'स्वराज्य' व त्यासारख्या इतर शब्दांचा अर्थ काय ते आम्हांला माहीत नाही. कारण आमचे पुढारी 'स्वराज्य' या शब्दाचे अनेक वेगवेगळे अर्थ लावीत आहेत. आपल्याला संपूर्ण स्वातंत्र्य हवे असेल तर, दुसरी कोणतीही गोष्ट करण्यापूर्वी, आपण प्रथम सारे नियम, कायदे, निर्बंध व बंधने यांच्या विरुद्ध बंड केले पाहिजे आणि असा विद्रोह करावयाचा म्हणजे प्रथम आपण स्वतःलाच ओळखले पाहिजे...विद्रोह करणे म्हणजे सर्वसंहार किंवा

प्रत्येक गोष्टीचा विनाश करणे नव्हे. त्याचा अर्थ असा की तुम्हांला जे काही निरर्थक वाटत असेल त्यासंबंधी ' मला हे मान्य नाही ', असे तुम्ही मस्तक उंच करून ठणकावून सांगितले पाहिजे. ' धूमकेतू 'चे म्हणणे असे की, तुमचे अंतःकरण जसा कौल देईल तसेच तुम्ही वागा. धर्म, समाज, राजा किंवा परमेश्वर यांपैकी कुणाचीही भीती तुम्ही बाळगू नका...सत्याचे आकलन होण्यासाठी माणसाने बंडच केले पाहिजे ... तुम्ही योग्य प्रकारे विद्रोह करू शकलात, तुम्ही प्रलय निर्माण करू शकलात तर शिव जागा होईल आणि सुंदरमचे अधिराज्य स्थापन होईल."

चालू विवेचनाच्या दृष्टीने हे उतारे पुरेसे आहेत. यांतून भावनेची झळाळी, शब्दकळेचे नादमाधुर्य आणि शैलीचा प्रचंड सपाटा व्यक्त होऊ शकलेला नाही. तरीपण नजरुल यांची वैयक्तिक जीवनकार्य व त्या दिशेने त्यांच्या चाललेल्या प्रयत्नांवरील निष्ठा, त्यासंबंधी त्यांच्या मूलभूत कल्पना, त्यांची राजकीय श्रद्धा व क्रांतिकारक उत्साह या गोष्टी त्यांतून स्पष्ट झाल्यावाचून राहात नाहीत. त्याचप्रमाणे त्यांच्या कल्पनांमधील मोघमपणा, आणि भावनांचा सच्चेपणाही लपून राहात नाही. ' धूमकेतू 'च्या संपादकीय लेखांपैकी काही लेख आणि वर उद्धृत केलेल्या जाहीरनाम्यासारखी काही घोषणापत्रे कालांतराने निवडून ती दोन गद्य खंडांमध्ये प्रसिद्ध करण्यात आली. त्यापैकी पहिला खंड ' दुर्दिनेर यात्री ' (आपत्कालातील प्रवासी) या शीर्षकाने १९३८ साली प्रसिद्ध झाला; आणि दुसरा ' रुद्र-मंगल ' (रुद्रास आवाहन) या शीर्षकाने १९४१ साली प्रकाशित झाला. त्याचप्रमाणे ' धूमकेतू ' मधून प्रकाशित झालेल्या कविता १९२४ साली प्रकाशित झालेल्या ' विषेर बाँशी ' (विषारी बासरी) आणि ' भांगार गान ' (विध्वंसाचे गाणे) या संग्रहामध्ये समाविष्ट करण्यात आल्या. त्यांची चर्चा आपण नंतर करणारच आहोत. (यांपैकी काही कवितासंग्रह प्रसिद्ध झाल्यानंतर लौकरच जप्त करण्यात आले होते, हेही या संदर्भात नमूद केले पाहिजे). घटनाक्रमाचे सूत्र कायम ठेवण्यासाठी याठिकाणी हे सांगितले पाहिजे की बंगाली वाचक, विशेषतः तरुण लोक ' धूमकेतू 'च्या प्रत्येक अंकावर बेभानपणे तुटून पडू लागले. अर्थात् असे घडणार होते, याची कल्पना आपण करू शकतो. त्याच्या प्रत्येक अंकाची किंमत आगाऊ भरली जाई; आणि स्वाभाविकपणेच प्रत्येक सायंकाळी मोठा जल्लोष साजरा केला जाई. विशेषतः ज्या दिवशी त्या पत्राचा अंक छापखान्यातून बाहेर पडे त्या दिवशी ' धूमकेतू ' कचेरीजवळच्या खास बंगाली ढंगाच्या अड्ड्यावर या जल्लोषाला ऊत येई. (' धूमकेतू 'चे कार्यालय ३२, कॉलेज स्क्वेअर ही जुनी जागा बदलून ७, प्रताप चॅटर्जी लेन या नव्या जागेत हलविण्यात आले होते). दररोज संध्याकाळी अनेक कवी, लेखक, राजकारणी लोक व कवीचे ' बंडखोर ' मित्र त्या अड्ड्यावर गोळा होत आणि चहाचे कपांवर कप

रिचविण्यात सहभागी होत. त्यांच्या बडबडीनं तेथे मोठा कोलाहल निर्माण होई. मधूनच ' दे गोरुर गा धुइये ' ( गायीला धुवा ) अशी आरोळी उठे. त्या आरोळीला काही अर्थ नव्हता. नजरुल व त्यांचे मित्र यांच्यांतील अभिवादनाचा तो नुसता एक ढंग होता. नजरुल जेथे जातील तेथे आनंदोल्लास व चंडखोरपणा त्यांच्या बरोबरच असावयाचा. तीच भाववृत्ती तेथे विद्यमान असल्याचा तो पुरावा होता. हा त्यांच्या विजयाचा पहिला प्रहर होता. परंतु बंगालच्या पोलिसी गजवटीला ते सपणे शक्य नव्हते. 'धूमकेतू'चा प्रत्येक अंक हे सरकारच्या अस्तित्वाला आव्हान, आणि त्याच्या ' शांतता, सुव्यवस्था व सुप्रशासन ' यांना धोका होता. त्यामुळे ' धूमकेतू 'चे आयुष्य अल्पकालीन ठरणार हे दैवच बोलून चुकला होता. पूजा उत्सवांचा ( शरदृतूत येणाऱ्या उत्सवांचा ) मोसम जवळ आला होता. दुर्गापूजेच्या निमित्ताने खास अंक काढणे ही बंगाली नियतकालिकांची जुनी परंपरा आहे. त्या रूढीला अनुसरून नजरुल यांनी दुर्गापूजेच्या निमित्ताने आपल्या पत्रासाठी ' आनंदमयीर आगमने ' ( आनंदमयीच्या आगमन-प्रसंगी ) ही एक खास कविता लिहिली.

प्राचीन धार्मिक ग्रंथानुसार दुर्गा ही लढाऊ चंडी देवता आहे. ती राक्षसांचा, जुलुमशहांचा नाश करणारी आहे. ती निव्वळ दुबळी देवी नसून लढाऊ बाण्याची रक्षणकर्त्री आहे. ही दुर्गामाता त्यावेळी मातृभूमीचे प्रतीक बनली होती. या सोयिस्कर प्रतीकाचा विकास बंकिमचंद्र चट्टोपाध्याय यांच्या काळापासून सतत चाळीस वर्षे होत आलेला होता. परकीय जुलुमशहांविरुद्ध शस्त्र उचलण्याचा आदेश ती देत आली होती. या प्रतीकवादाचे सूचन बंकिमबाबूंनीच प्रथम ' कमलाकान्तेर दफ्तर ' ( १८७५ ) मधील ' आमार दुर्गोत्सव ' (' आमचा दुर्गोत्सव ') या निबंधात आणि नंतर ' आनंद मठ ' या कादंबरीत ( १८८२-८३ ) केले होते. त्यामुळे दुर्गा ही आनंदमयी असली तरीही ती मातृभूमीसमान होती. तिचे आवाहन करिताना वापरण्यात आलेला प्रतीकवादाचा पडदा इतका क्षिरांक्षरीत होता की पोलिसांच्या जागरूक व दक्ष डोळ्यांना फसविणे त्याला शक्यच नव्हते. नजरुल-नाही कवितेच्या भावनात्मक आवाहनाखेरीज दुसरा कसला अर्थ त्यातून निघावा, असे वाटत नव्हते. ही देवी अत्याचार करणाऱ्यांचा नाश करते ही जी पारंपरिक भावना तीच त्या स्वातंत्र्यप्रेमी कवीला अभिप्रेत होती. परंतु कवितेची शैली व शब्दकळा ही पारंपरिक नव्हती. ती गारठलेलीही नव्हती अथवा अलंकारिकही नव्हती; तर बोलभाषेची होती. त्या कवितेमध्ये तत्कालीन घटनांचे व जनतेविरुद्ध पोलिसांनी योजिलेल्या दमनकारी उपाययोजनांचे सहज लक्षात येण्यासारखे संदर्भ अथवा निर्देश होते. तिच्यात अत्यंत बोचरा उपहास होता आणि राक्षसांसारख्या अत्याचाऱ्यांवर क्षणक्षणीत कोरडे ओढलेले होते. पोलिसांनी ताबडतोब त्या कवितेचा लेखक व पत्राचा संपादक यांच्या अटकेचे पकडवॉरंट घेऊन 'धूमकेतू'च्या

कचेरीवर धाड घातली, आणि तेथे सापडल्या त्या 'धूमकेतू'च्या विशिष्ट अंकाच्या साऱ्या प्रती जप्त केल्या. संपादक मात्र तेथे हजर नव्हता. वस्तुतः त्यावेळी नजरुल हे कलकत्त्याच्या बाहेर होते. त्यानंतर ते कोमिल्लाला गेले आणि आपले पूर्वीचे यजमानमित्र इंद्रकुमार सेनगुप्त यांच्या घरी राहिले. त्यावेळी त्या आश्रयस्थानात ते सुरक्षित होते; आणि 'धूमकेतू'चे प्रकाशन चालू राहिले.

परंतु 'धूमकेतू'च्या दिवाळी अंकात 'मैं भूखा हूँ' या शीर्षकाचे एक जळजळीत संपादकीय प्रकाशित झाले. आपल्याला रक्त व बलिदान हवे असल्याची मागणी दुर्गा करीत आहे, असा त्याचा गर्भितार्थ होता. यावेळी पोलिसांनी झटपट हालचाल केली. त्यांना नजरुलचा पत्ता सहज लागला; आणि त्यांनी त्यांना कोमिल्लाला अटक करून कलकत्त्यास आणले; व देशद्रोहाच्या आरोपाखाली प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटच्या कोर्टात उभे केले. त्या खटल्यामध्ये कवीवरील आरोप सिद्ध होऊन १६ जानेवारी १९२३ रोजी त्याला एक वर्षाची सक्तमजुरीची शिक्षा ठोठावण्यात आली. हे सारे अपरिहार्यच होते. मात्र ही शिक्षा सुनावण्यापूर्वी कवीला एक उदात्त निवेदन करण्याची संधी देण्यात आली. आरोपीच्या पिंजऱ्यात उभे राहून नजरुल यांनी आपली लेखी जबानी वाचून दाखविली. ही जबानी 'राजबंदीर जबानबंदी' (राजबंद्याची जबानी) या नावाने प्रसिद्ध आहे. तिच्यातील आंतरिक गुणसमुच्चय, भावावेश व उदात्त आदर्शवाद यांमुळे तिने आमच्या साहित्याला समृद्ध बनविले आहे. काही महिन्यांपूर्वी महात्मा गांधींनी त्यांच्यावरील खटल्यात न्यायालयासमोर जबानी दिली होती. त्यांच्याप्रमाणेच इतरही प्रख्यात राजनीतिज्ञांनी अशा जबान्या दिल्या होत्या. त्यांच्यापेक्षा नजरुलची जबानी आशय व कल्पना यांच्या बाबतीत वेगळी असली तरी ती रोखठोक व साधीसुधी होती. गांधीजींनी ज्या शासनाला 'सैतानी सरकार' म्हणून संबोधले होते ते सरकार आणि त्यांची न्यायपालिका, कार्यपालिका वगैरे सर्व उपकरणे किंवा साधने यांचा उघड-उघड शब्दांत 'राजबंदीर जबानबंदी' मध्ये धिक्कार करण्यात आला होता. सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे तिच्यामध्ये निर्भयपणे असे घोषित करण्यात आले आहे की, कवी हा 'परमेश्वराचा निवडक लाडका आवाज' आहे, तो सत्याची कास धरणारा आहे, भारतीय परिस्थितीचे सत्य स्वरूप तो उघड करून सांगतो. तो देवाचे व न्यायाचे कार्य करतो. आणि साऱ्या किळसवाण्या गोष्टींचा विध्वंस करण्यास तो कारणीभूत होतो.

"मला असा साक्षात्कार झाला की मी जागतिक क्रांतीतील त्याचा (परमेश्वराचा) लाल शिपाई आहे. सत्याचा पाठराखण करणे आणि न्यायाची पुनःस्थापना करणे हे या क्रांतीचे उद्दिष्ट आहे. जादूटोण्याच्या साह्याने निद्रित करण्यात आलेल्या या शस्यश्यामल वंगभूमीवर ललकारी देणारा व तुतारी वाजविणारा अग्रदूत म्हणून त्याने मला धाडले आहे. मी

केवळ एक साधा शिपाई आहे आणि त्याची आज्ञा अमलात आणण्याचा मी कसोशीने प्रयत्न केला आहे. "

अशा प्रकारचे विचार त्या जबानीत आहेत; आणि आजही तो एक संस्मरणीय दस्तऐवज आहे. स्वाभाविकपणेच, नजरुल अपराधी ठरले, आणि वर सांगितल्याप्रमाणे, त्यांना शिक्षा ठोठावण्यात आली.

त्यानंतर 'धूमकेतु'चे प्रकाशन प्रथम दोन आठवड्यांसाठी स्थगित करण्यात आले; आणि पंधरा दिवसानंतर तो पाक्षिक स्वरूपात प्रकाशित होऊ लागला. नजरुलचे सहाय्यक बीरेंद्रनाथ सेनगुप्त हे त्याचे संपादक बनले. (पुढे ते फ्री प्रेस ऑफ इंडियामध्ये काम करू लागले. नजरुलचे मित्र व नातेवाईक कोमिल्लाचे बीरेंद्रकुमार सेनगुप्त यांच्याशी त्यांची गल्लत होऊ नये). 'धूमकेतु' पाक्षिकाच्या पहिल्या अंकात 'राजबंदीर जबानबंदी' ही नजरुलची कोर्टातील जबानी प्रसिद्ध करण्यात आली. 'प्रवर्तक' व 'उपासना' या दोन मासिकांनीही ही जबानी आपल्या पुढील अंकांत प्रकाशित केली. परंतु पाक्षिक 'धूमकेतु' मात्र आणखी एक अंक निघून बंद पडला. नजरुल हे 'धूमकेतु'चे शरीर व आत्मा होते. त्यांच्याशिवाय ते पाक्षिक जिवंत राहाणे शक्य नव्हते. पुढे काळ बदलला आणि स्वतः नजरुल यांनी आपल्या जीवनाच्या वेगळ्या टप्प्यात प्रवेश केला तेव्हाही त्या पाक्षिकाचे पुनरुज्जीवन होऊ शकले नाही. सुमारे दहा वर्षांनंतर, १९३१ साली काही उत्साही मंडळींनी एका मित्राच्या संपादकत्वाखाली पुनः 'धूमकेतु' सुरू करण्याचा प्रयत्न केला; आणि 'काजी नजरुल इस्लाम यांच्या मार्गदर्शनाखाली' असे छापू देण्यासाठी खुद्द नजरुल यांचेही मन वळविण्यात आले. परंतु नजरुल यांनी व्यक्तिशः त्याच्या कामात काहीच लक्ष घातले नाही. जेथवर नजरुल यांचा संबंध आहे तेथवर १९२३ च्या जानेवारीत त्यांना तुरुंगवासाची शिक्षा होताच 'धूमकेतु' विराम पावला असे आपण समजण्यास हरकत नाही.

अशा प्रकारे १९२३ हे साल नजरुल यांच्या कारावासाने (१६ जानेवारी १९२३) सुरू झाले; आणि ११ महिन्यांनंतर (रीतसर काही आठवड्यांची सूट मिळाल्याने) संपूर्ण कारावास भोगून नजरुल १५ डिसेंबर १९२३ रोजी तुरुंगातून सुटले हेही त्याने पाहिले. परंतु ते वर्ष इतरही उल्लेखनीय व संस्मरणीय घटनांनी ठळकपणे उठून दिसणारे ठरले. आपण पूर्वी पाहिल्याप्रमाणे नजरुल यांच्या अविस्मरणीय 'अग्निवीणा' या पहिल्याच कवितासंग्रहाचे प्रकाशन या वर्षी झाले, आणि हां हां म्हणता त्याची दुसरी आवृत्तीही निघाली. तथापि नजरुल यांच्या दृष्टीने त्या काळची सर्वात महत्त्वाची घटना म्हणजे रवींद्रनाथ टागोरांनी आपले नुकतेच लिहिलेले 'वसंत' हे गीतनाट्य पुढील शब्दांत त्यांना अर्पण केले ही होय : 'श्रीमान कवि काजी नजरुल इस्लाम, स्नेहभाजनेषु'. टागोरांच्या हातून झालेली

ती एक अर्थपूर्ण कृती होती. त्यांच्या अंतःकरणाची विशालता आणि निर्मळ गुणग्राहकता यांचे दर्शन त्या कृतीतून होते. त्याने नजरुल आनंदातिशयाने व कृतज्ञतेने फुलून गेले. रवींद्रनाथ हे स्वतः भारतीय जनतेच्या उच्च सदसद्विवेक-बुद्धीचे साकार रूप होते. त्यांच्याकडून असा स्नेहभाव व्यक्त होणे ही गोष्ट 'धूमकेतू'मुळे ख्यातिप्राप्त झालेल्या नजरुलना राष्ट्रीय मान्यता मिळवून देणारी ठरली, यात मुळीच शंका नाही. या घटनेचे वैशिष्ट्य नीट लक्षात येण्यासाठी त्याकाळी चालू असलेल्या राजकीय चळवळींशी रवींद्रनाथ पूर्णपणे सहमत नव्हते, त्यांना ते फारसे पसंत नव्हते, हे आपण लक्षात घेतले पाहिजे. असहकार, चरखा, विदेशी कापडांचा बहिष्कार आणि पाश्चात्त्य इंग्रजी शिक्षण यांबाबतीतील गांधीजींच्या विचारांशी आपला मतभेद असल्याचे टागोरांनी जाहीरपणे सांगितले होते. नजरुल यांचा बंडखोरपणा आणि क्रांतिकारक बदलांसाठी त्यांनी केलेले आवाहन यांच्याशी रवींद्रनाथ सहमत होणे शक्यच नव्हते. उलट, १९०८ साली त्यांनी दिलेल्या 'स्वदेशी समाज' या आपल्या प्रख्यात भाषणात जे विचार व्यक्त केले होते त्यावरील त्यांची श्रद्धा अधिकच दृढमूल झालेली होती. त्या भाषणामध्ये त्यांनी सामाजिक पुनर्रचना व राष्ट्रीय पुनरुत्थापन यांच्या कार्यक्रमाची रूपरेखा दिली होती. अशा प्रकारच्या शांतपणे व धिमेपणाने करावयाच्या कामासाठी लागणारा स्वभाव नजरुल यांच्याजवळ नव्हता. ते स्वभावतःच तुफानी वृत्तीचे होते. या दोन कवींची त्यापूर्वी भेट झाली होती आणि याबाबतीत आपल्या गुरूशी असलेले मतभेद नजरुल यांनी सांगून टाकले होते, हेही सर्वांना माहीत आहे. इतके असूनही कवी व गीत लेखक या नात्याने नजरुल यांच्या प्रतिभागुणांचे टागोरांना कौतुक वाटत होते, असे म्हणतात. नजरुल यांना नियमित सरावाने आपल्या अंगच्या काव्यगुणांचा विकास करण्याची संधी मिळावी यासाठी टागोरांनी त्यांना शांतिनिकेतनला बोलावले होते; आणि त्यांनी आंदोलनात्मक राजकारणापेक्षा साहित्याकडे अधिक लक्ष द्यावे, असाही सल्ला रवींद्रनाथांनी नजरुलना दिला होता. परंतु त्यांचा हा उपदेश ऐकण्याच्या मनःस्थितीत नजरुल त्यावेळी नव्हते. उलट राजकारणात उघड-उघड गुंतण्याची त्यांची इच्छा होती. टागोरांना याचे दुःख झाले; कारण त्यांच्या मते, तसे करणे म्हणजे कवी या नात्याने निसर्गाकडून नजरुल यांना प्राप्त झालेल्या देणगीचा किंवा दैवीगुणांचा तो गैरवापर होता. आपल्या विनोदी व लोकहितैषी स्वभावानुसार रवींद्रनाथांनी आपल्या खास शैलीत नजरुल यांच्या या कृतीचे वर्णन 'तलवारीच्या पात्याने दाढी करण्याचा प्रयत्न' (तलवार दिये दाड़ि चाँचा) या शब्दांत केले. त्यामुळे नजरुल इस्लाम तुरुंगात असताना टागोरांनी त्यांना उघडपणे मान्यता दिली, ही गोष्ट बंगाली लोकांना अत्यंत आनंददायक वाटली तिच्यामुळे देशाचे सरकारही अधिक मूर्ख व निर्बुद्ध असल्याचे उघड झाले.

परंतु अशा परिस्थितीला तोंड देण्याचा नोकरशाहीचा आपला स्वतःचा असा मार्ग होताच. नजरुल हे केवळ एक कैदी होते, 'राजद्रोही' होते. अशा कैद्यांशी कसे वागावयाचे ते अधिकाऱ्यांना काय माहीत नव्हते! आणि नजरुल यांचाही स्वतःचा असा मार्ग होता व त्यांच्या आव्हानाला कसं उत्तर द्यावयाचे हे त्यांना चांगले माहीत होते. त्यावेळच्या तुरुंगाच्या नियमाप्रमाणे समाजातील त्यांचा दर्जा व गुन्ह्याचे स्वरूप लक्षात घेता त्यांना तुरुंगात खास वर्ग मिळावयास हवा होता. तो त्यांचा हक्क होता. परंतु इतर राजकीय कैद्यांना तो वर्ग नाकारण्यात आला होता; आणि नजरुल यांनाही जेव्हा पहिले काही दिवस त्यांनी अलीपुर सेंट्रल जेलमध्ये काढल्यावर हुगळी डिस्ट्रिक्ट जेलमध्ये हलविण्यात आले तेव्हा काहीही कारण नसताना त्यांचा तो खास वर्ग काढून घेण्यात आला; आणि नर्वाल काँग्रेसी राजबंद्यांना जसे अन्यायाने सामान्य गुन्हेगार कैद्यांसारखे वागविण्यात आले होते तसे त्यांनाही वागविण्यात येऊ लागले. त्यामुळे इतर काही राजबंद्यांसह नजरुल यांनी हुगळीच्या तुरुंगात त्या अन्यायाविरुद्ध आंदोलन उभारले. त्यांचे हक्क नाकारण्यात आले होते. त्यामुळे नजरुल व त्याचे सहकारी यांनी तुरुंगातच सविनय कायदेभंग सुरू केला. त्याचा परिणाम म्हणून अधिकाऱ्यांनी अधिक कडक शिक्षा देणारे उपाय योजिले 'शिक्षा आहार', 'शिक्षा कपडे', 'शीण आणणारे काम', 'दंडाबेडी', 'खोडाबेडी' वगैरे. या साऱ्या शिक्षा एकामागून एक करण्यात आल्या. अखेर शेवटी नजरुल व त्यांचे सहबंदी यांनी तुरुंगातील दंडपशाही व दहशत यांच्याविरुद्ध अन्न-सत्याग्रह सुरू केला.

उपाशी पोटी दिवस गेले, रात्री गेल्या, आणि आठवडेही निघून गेले. तुरुंगाबाहेरील जनतेमधील अस्वस्थता दिवसेंदिवस वाढू लागली. परंतु आपल्यावर प्रेम करणाऱ्या मित्रांची व आपल्याला आदरणीय वाटणाऱ्या राष्ट्रीय पुढाऱ्यांची अनशन सोडण्याविषयीची विनंती नजरुल यांनी मान्य केली नाही. नजरुल यांचा अन्नसत्याग्रह व त्यांची नाजुक होत चाललेली प्रकृती यांची बातमी समजताच शिलाँग ( असम ) हून टागोरांनी त्यांना तार केली : "उपोषण सोडा. आमच्या साहित्याला तुमची गरज आहे." ही तार नजरुल यांना न देता 'मालक सापडत नाही' असा शेरा मारून अधिकाऱ्यांनी ती टागोरांकडे परत पाठविली. त्यानंतर देशबंधु चित्तरंजनदास व कादंबरीकार शरच्चंद्र चट्टोपाध्याय यांच्या पुढाकाराने कलकत्त्यात एक प्रचंड सार्वजनिक सभा भरविण्यात आली. या सभेमध्ये नजरुल यांना असे आश्वासन देण्यात आले की, "बंगालची जनता राजबंद्यांच्या बाजूने उभी आहे. तेव्हा राजबंद्यांनी उपोषण सोडून जनतेला त्यांचा लढा लढण्याची संधी द्यावी." अशाच प्रकारचे आश्वासन टागोरांकडूनही पुनः प्राप्त झाले. अखेर अन्नसत्याग्रह मागे घेण्यात आला. आणखी कटकटी टाळण्यासाठी तुरुंगाधि-

काऱ्यांनी नजरुल यांना हुगळीच्या तुरुंगातून बरहमपूरच्या तुरुंगात पाठविले; आणि ज्या वरच्या वर्गासाठी त्यांनी लढा केला होता तो वरचा वर्ग त्यांना दिला.

त्यामुळे आता त्यामानाने अधिक शांततापूर्ण स्थितीत नजरुल यांच्या जेल-जीवनाचे अकरा महिने १५ डिसेंबर १९२३ रोजी पूर्ण झाले. बंगाली साहित्यात अनेक कवितांच्या व गीतांच्या रूपाने हे जेल-जीवन चिरस्थायी स्मारक बनून राहिले. त्या काळात त्यांनी लिहिलेल्या कवितांमध्ये 'सुपरबंदना' (जेलच्या सुपरिंटेंडेंटला वंदन) हे कठोर उपहासगीत होते; तसेच 'शिकल-परार गान' (बेड्या परिधान करण्याचे गाणे) हेही प्रख्यात गीत होते. त्याच्या सुरुवातीच्या या ओळी प्रत्येकाच्या ओठांवर खेळत होत्या :–

एइ शिकलपरा छल आमादेर, शिकलपरा छल

याचा मथितार्थ असा की, "आम्हाला बेड्या घालणे म्हणजे निव्वळ फसवणूक आहे, नुसता देखावा आहे. या बेड्या अंगावर वागवूनही आम्ही अत्याचाऱ्यांची मती गुंग करून सोडतो."

## प्रकरण चौथे

# जनतेचा कवी

" दगडी भिंतींनी तुरुंग बनत नसतो." नजरुल इस्लाम या कवीच्या बाबतीतही १९२३ साली केव्हाही दगडी भिंतींनी तुरुंग बनविला नाही. त्यांच्या कविता आणि गाणी अचूकपणे तुरुंगाच्या भिंती ओलांडून बाहेरच्या जगातील बंगाली नियतकालिके व वाचक यांच्यापर्यंत जाऊन पोचल्या. किंबहुना, त्यांना अधिक मोठ्या प्रमाणावर वाचकवर्ग लाभला. हुगळीला तुरुंगाबाहेर त्यांच्या मित्रांची व चाहत्यांची संख्या खूप वाढली; आणि त्यांनी तुरुंगात असलेल्या कवींशी व कलकत्त्यातील त्यांच्या मित्रांशी संपर्क स्थापित केला. अखेर जेव्हा नजरुल तुरुंगातून मुक्त झाले तेव्हा त्यांनी हुगळीलाच स्थायिक व्हावे यासाठी तेथील मित्रांनी त्यांचे मन वळविले; आणि सुमारे दोन वर्षे – १९२४ व १९२५ साली ( बहुधा २ जानेवारी १९२६ पर्यंत ) नजरुल हुगळीलाच राहिले.

कारावासातून सुटका झाल्यावर नजरुल पुनः राजकारणात पडले. पहिल्या-पेक्षाही अधिक उत्साहाने ते राजकारणात भाग घेऊ लागले, ही गोष्ट सहज समजण्यासारखी आहे. कारण सबंध बंगालभर राजकीय व साहित्यिक मंडळींची वारंवार जी सभा-सम्मेलने भरत त्यांमध्ये नजरुल यांना खूप मागणी असे. भारतीय राजकारणाच्या दृष्टीने तो खिन्नतेचा, ओहोटीचा काळ होता; आणि त्यातून मतभेद उफाळणे आणि राष्ट्रीय लढ्याचे नवे मार्ग व साधने यांचा शोध घेणे या गोष्टी अपरिहार्यच होत्या. बार्डोलीच्या ठरावामुळे अत्यंत वेगाने चालू असलेले संघर्षाचे यंत्र एकदम पूर्णपणे बंद पडले होते. विधायक कार्यक्रमाच्या क्षोभरहित, थंड कामाला जोडून त्या यंत्रात चैतन्य निर्माण करणे शक्य नव्हते. जनआंदोलन त्या ठरावाने कोसळून पडेल अशी भीती त्यावेळीही देशबंधू चित्तरंजन दास, मोतीलाल नेहरू व इतर पुढारी यांनी व्यक्त केली होती. त्यांचा अंदाज खरा ठरला होता. आणि एकदा असा निरुत्साह पसरताच ब्रिटिश सत्ताधाऱ्यांनी ती संधी हातची जाऊ दिली नाही. त्यांनी आपल्या नेहमीच्या सवयीने अधमपणाचा मार्ग अवलंबून गांधीजींना लोकांच्या नजरेपासून दूर नेले. त्यांना

राजद्रोहाच्या आरोपावरून सहा वर्षाची सक्तमजुरीची शिक्षा ठोठावून तुरुंगात डांबण्यात आले. चित्तरंजन दास, मोतीलाल नेहरू व इतर पुढारी तुरुंगातून मुक्त झाल्यावर त्यांनी असहकाराच्या कार्यक्रमात फेरबदल करण्याची मागणी केली. 'बेजबाबदार ' सरकारला विरोध करण्यासाठी कायदेमंडळाचा वापर करावा आणि 'कायदेमंडळात जाऊन सरकारशी आतून असहकार करावा' असे प्रतिपादन त्यांनी केले. त्यांच्या या फेरवादी धोरणाला बहुसंख्य काँग्रेसजनांनी कडाडून विरोध केला. त्यांना 'नाफेरवादी' असे म्हणतात. त्यांचे नेतृत्व चक्रवर्ती राजगोपालाचार्य यांच्याकडे होते. हा विरोध एवढा तीव्र होता की डिसेंबर १९२२ मध्ये काँग्रेसच्या गया अधिवेशनाचे अध्यक्षपद भूषविलेल्या चित्तरंजन दासांनी अध्यक्षपदाचा राजीनामा दिला; आणि नंतर ( १९२३ साली ) मोतीलाल नेहरू, हकीम अजमल खान व इतर पुढाऱ्यांच्या सहकार्याने काँग्रेस स्वराज्य पार्टी या नावाचा एक पक्ष स्थापन केला. अर्थात् हा पक्ष काँग्रेसच्या अंतर्गतच होता. काँग्रेसजनांना व इतर लोकांना आपला दृष्टिकोण पटवून देण्यासाठी त्यांनी हा पक्ष काढला होता. १९२३ हे वर्ष म्हणजे लोकांच्या दृष्टीने मानसिक गोंधळ व अपेक्षाभंग यांनी भरलेला कटुतापूर्ण काळ होता. विधायक कार्यक्रम अयशस्वी झाला आहे असे त्यांना वाटत होते; परंतु त्याचबरोबर लढाऊ कार्यकर्त्यांची जी आघाडी निर्माण झाली होती तिच्यात फूट पडण्याचे दुःखही त्यांना होत होते. अखेर हा वाद मौलाना मुहम्मद अली यांच्या प्रयत्नांमुळे काही अंशी मिटविण्यात आला. दिल्ली येथील काँग्रेसच्या खास अधिवेशनात ( १९२३ ) स्वराज्य पक्षाला त्याच्या स्वतःच्या बळावर विधिमंडळाच्या आगामी निवडणुका लढविण्याची परवानगी देण्यात आली. मात्र त्याकामी त्यांनी काँग्रेसचे नाव अथवा साधनसामग्री यांचा मुळीच वापर करिता कामा नये, अशी अट घालण्यात आली. परंतु एवढी परवानगीही स्वराज्य पक्षीय मंडळींना पुरेशी होती; आणि त्यांच्याभोवती लोक जमा होऊ लागले. कारण लोकांच्या नजरा आकर्षून घेण्यास व त्यांचा मलूल झालेला उत्साह टवटवीत करण्यास निवडणुकांच्या रूपाने त्यांना एक मूर्त साधन उपलब्ध झाले होते. स्वराज्य पक्षाच्या प्रयत्नामुळे सर्वसामान्य लोकांना स्वराज्याच्या एखाद्या भरीव संघर्षात सहभागी होण्याची संधी जरी प्रत्यक्षपणे उपलब्ध झाली नाही, तरी त्या पक्षाच्या संसदीय कामांमुळे त्या मर्यादित क्षेत्रात काही अंशी लोकांचा उत्साह कायम टिकविण्याच्या कामी त्यांची मदत अवश्य झाली. कारण बार्डोलीच्या विधायक कार्यक्रमविषयक ठरावामुळे एकूण देशातच एकप्रकारचे निरुत्साहाचे वातावरण पसरले होते. स्वातंत्र्य-आंदोलनाच्या प्रत्यक्ष उठावणीसाठी लोकांना १९३० पर्यंत थांबावे लागणार होते. डिसेंबर १९२९ मध्ये स्वातंत्र्याचा ठराव झाला आणि मार्च १९३० मध्ये सविनय कायदेभंगाची चळवळ सुरू झाली. त्यावेळी पुनः जनतेचा स्वातंत्र्यलढा चालू झाला. ते कसेही असले तरी, १९२४

साल हे स्वराज्य पक्षाच्या चळवळीचे व कार्यक्रमांचे प्रारंभिक वर्ष होते. त्या काळात लोकांना असहकाराच्या कार्यक्रमाचा फेरविचार करण्याची आणि केवळ 'नाफेरवादी' व 'कर्मठ गांधीवादी' न राहाता दुसरा एखादा अधिक परिणाम-कारक मार्ग शोधून काढण्याची संधी मिळाली. बंडखोर कवी आणि 'धूमकेतु' चा कवी या नात्याने नजरुल यांना 'नाफेरवाद्यां'सारख्या 'उपचारवाद्यां'विषयी कसलेच आकर्षण वाटत नव्हते. 'फेरवादी' लोक त्यामानाने अधिक कृतिशील होते. त्यांच्याविषयी नजरुलना अधिक आकर्षण वाटले; आणि त्यांच्या रूपाने जनआंदोलनाला पाठिंबा देणारा एक ज्वलज्जहाल कार्यकर्ता फेरवाद्यांना मिळाला. अशा प्रकारे तुरुंगातून सुटल्यानंतर १९२४ साली नजरुल हे राजकीय व साहित्यिक सभासंमेलनांच्या निमंत्रणांवरून जिल्ह्या-जिल्ह्यात सतत फिरत राहिले. या काल-खंडात नवीन प्रकारच्या कविता व गीते यांचीही निर्मिती ते करीत राहिले. त्यांचे चांगले स्वागत झाले. आणि ते योग्यच होते. त्यांपैकी अधिकांश 'सार्वजनिक काव्ये व 'सार्वजनिक गीते' होती. याचा अर्थ असा की सम्मेलने व मोठ्या सभा यांसारख्या सार्वजनिक प्रसंगांशी त्यांचा संबंध असे. यासंबंधीचे विवेचन नंतर येईल.

दरम्यान, नजरुल यांच्या वैयक्तिक जीवनातील काही महत्त्वाच्या घटनांचा उल्लेख करणे आवश्यक आहे. या घटनांचा त्यांच्या खासगी जीवनाप्रमाणेच सार्वजनिक गोष्टींशीही संबंध होता. किंबहुना सार्वजनिक जीवनाशी त्यांचा अधिक संबंध होता, असेही म्हणता येईल. अशा प्रकारच्या 'खाजगी' घटनांपैकी सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे नजरुल यांचा विवाह (एप्रिल १९२४) ही होय.

आपण पूर्वी पाहिल्याप्रमाणे नजरुल हे कोमिल्लाच्या सेनगुप्त कुटुंबात वारंवार पाहुणे म्हणून जात असत. त्याठिकाणी योगायोगाने त्यांना एकदा मुक्काम करावा लागला असता घरधनीण बिराज सुंदरी देवी यांच्या वात्सल्यामुळे ते घर त्यांचे जणू स्वतःचेच घर बनले. घरातील इतर लहान-थोर मंडळींच्या वागणुकीने जे स्नेहाचे वातावरण निर्माण झाले होते त्यायोगे त्यांचे तेथे नेहमीच स्वागत होई. या स्नेहसंबंधातून त्या घरातील तरुण मुलगी प्रमिला हिच्याविषयी नजरुल यांच्या मनात हळूहळू अनुराग वाढत गेला. (नंतर ती प्रमिला नजरुल इस्लाम बनली. ती आपली सही अशीच करीत असे). आम्ही पूर्वी सांगितल्याप्रमाणे प्रमिला ही श्री सेनगुप्त यांची पुतणी आणि त्यांची विधवा भावजय गिरिबाला देवी यांची एकुलती एक मुलगी होती. बंगाली कुटुंबात सामान्यतः आढळते त्याप्रमाणे प्रमिला व गिरिबाला या दोघीही श्री सेनगुप्त यांच्यावर अवलंबून होत्या. प्रमिला ही वयाने १३ किंवा जास्तीत जास्त १४ वर्षांची होती. ('दुलि' व 'दोलन' ही तिची दोन टोपणनावे होती). नजरुल यांची सहृदयता व संपूर्ण मनःपूर्वकता यांविषयी आकर्षण वाटून ती हळूहळू त्यांच्याकडे ओढली गेली. १९२२ पर्यंत त्या दोघांना

एकमेकांविषयी वाटणाऱ्या भावनांची जाणीव झाली असावी, असे दिसते. त्यावर्षी 'मुस्लिम भारत'मध्ये 'विजयिनी' या नावाचे एक प्रेमगीत प्रसिद्ध झाले होते. ते पुढे 'छायानट' या कवितासंग्रहात समाविष्ट करण्यात आले. त्या गीतावरून नजरुल व प्रमिला यांच्यांत प्रेमाच्या आणाभाका झाल्या असाव्यात असा अंदाज होतो. परंतु तोपर्यंत त्यांचे प्रेमप्रकरण ही एक नुसती कुजबुजच होती. नजरुल हे 'धूमकेतू'च्या संपादनात गुंतले होते. त्यातून त्यांना तुरुंगात जावे लागले. त्यामुळे त्यांना आपल्या भावनांविषयी खात्री करून घेण्यास अवधी मिळाला. १९२४ साली नजरुल हुगळीला स्थायिक झाल्यानंतर त्यांचा वाङ्निश्चिय झाला; आणि मग विवाहविधीही पार पडला. वेगवेगळ्या वर्तुळांत, या घटनेमुळे, त्याकाळच्या हिंदू व मुस्लिम समाजांत जी खळबळ उडाली तिच्याखेरीज या संदर्भात नमूद करण्यासारखे असे काही नव्हते. प्रमिला व नजरुल यांनी या प्रकरणात जे धैर्य व प्रेमाचे सामर्थ्य दाखवून दिले ते या खळबळीच्या पार्श्वभूमीवर चांगलेच उठून दिसले.

नजरुलसारख्या एका मुसलमानाशी एका सुशिक्षित हिंदू कुटुंबातील मुलीने लग्न करणे हे हिंदू धर्मशास्त्राच्या दृष्टीने नुसते निषिद्धच होते असे नव्हे तर बंगालमध्ये ज्या कुटुंबाशी ती मुलगी संबंधित होती व ज्या समाजातून ती आली होती त्यांच्या बदनामीलाही तो विवाह कारणीभूत झाला होता. या विशिष्ट प्रकरणात मुलीची आई गिरिबाला देवी यांच्याखेरीज सेनगुप्त कुटुंबातील इतर कोणीही या लग्नाला संमती दिली नव्हती. गिरिबाला देवी मात्र त्या दोघांच्या पाठीशी उभ्या राहिल्या आणि त्यांनी आपले जुने संबंध तोडून टाकून नव्या दांपत्याच्या कुटुंबाशी त्या एकरूप झाल्या. त्या कुटुंबातील वडीलधारे माणूस या नात्याने त्या त्यांच्या सुखदुःखात नेहमीच सहभागी झाल्या, असे आपल्याला आढळून येईल. विराज सुंदरी देवी यांना नजरुल हे पोटच्या मुलासारखे होते. तरीही त्यांनी त्या लग्नाला मान्यता दिली नाही. त्या लग्नसमारंभापासून दूर राहिल्या; आणि त्या दोघांशी व त्यांच्या बिऱ्हाडाशी त्यांनी बराचकाळपर्यंत काही संबंध ठेवला नाही. परंतु यात आश्चर्य वाटण्यासारखे काही नव्हते. त्यांना स्वतःला मुले व मुली होत्या आणि समाजाच्या क्रोधापासून व तिरस्कारापासून त्यांचे संरक्षण करणे त्यांचे कर्तव्य होते. त्यांची ही स्थिती नजरुलनी ओळखली आणि काही काळानंतर त्यांनी आपले 'सर्वहारा' ( निर्धन ) हे पुस्तक त्यांना अर्पण केले. सुदैवाने हा दुरावा १९३३ पर्यंत संपुष्टात आला, आणि जुने स्नेहसंबंध पुनः प्रस्थापित झाले. हे स्नेहसंबंध १९३८ साली विराज सुंदरींचे निधन होईपर्यंत कायम टिकून राहिले.

या लग्नाने सर्व मुसलमानही खूष झाले नाहीत. त्या वेळच्या वातावरणात जातीय दृष्टीने पाहता, त्यांचा तो एकप्रकारचा विजय होता. परंतु वधू अथवा वर यांपैकी कोणालाही हिंदू अथवा मुस्लिम धर्माच्या सांप्रदायिकतेची मुळीच पर्वा नव्हती. आणि कणासाठी काहीही करायला त्यांची तयारी होती. ज्या पद्धतीने

त्यांचे लग्न झाले ती पद्धतही अनेक मुसलमानांना असमाधानकारक वाटली. विशेषतः, तत्कालीन परिस्थिती ही परंपरागत मुस्लिम विवाह–पद्धतीला अनुकूल असताना त्यांनी त्या पद्धतीचा अवलंब न केल्यामुळे त्यांचा हा राग होता. त्यावेळी प्रमिलाचे वय जेमतेम सोळा वर्षांचे होते. अठरा वर्षांची होईपर्यंत तिला इंडियन सिव्हिल मॅरेज ॲक्टाप्रमाणे नोंदणी विवाह करिता येत नव्हता. तिला फक्त एकच मार्ग मोकळा होता. तो म्हणजे इस्लामचा स्वीकार करून मुस्लिम पद्धतीने लग्न करणे हा होय. धर्मपरिवर्तन न करिता मुस्लिम पद्धतीने लग्न करण्याची सवलत फक्त मुस्लिम, यहुदी व ख्रिस्ती लोकांनाच असते, कारण ते 'अहले किताब' (धर्मग्रंथ मानणारे लोक) असतात, असे सनातनी मुसलमानांचे मत होते. (मुसलमान कुराण मानतात, तर यहुदी व ख्रिस्ती बायबल हा पवित्र धर्मग्रंथ प्रमाण मानतात.) त्यामुळे मुसलमान झाल्याखेरीज प्रमिलेला नजरुलशी लग्न करिता येणे शक्य नव्हते. परंतु भारतामध्ये अकबरांसारख्या मुगल बादशहांनी ही सवलत हिंदू स्त्रियांनाही मिळण्याची व्यवस्था केली होती. त्यामुळे ते हिंदू स्त्रियांशी मुस्लिम पद्धतीने विवाह करीत आणि नंतर त्यांच्या हिंदू रीति-भाती व श्रद्धा यांचे पालन करण्याचे स्वातंत्र्यही त्यांना ते देत. सनातनी मुसल-मानांच्या मते हे चूक होते. परंतु कोणीही आपली श्रद्धा सोडून द्यावी, असे सांगण्यास नजरुल यांचे स्वाभिमानी व प्रामाणिक मन कधीच तयार झाले नसते. म्हणून अखेर प्रमिलेला इस्लामची दीक्षा न देताच त्या दोघांचे मुस्लिम पद्धतीने लग्न झाले. शिवाय नजरुल यांनी आपली पत्नी आणि आपले घर आपल्या सासूबाईंच्या स्वाधीन केले. त्या बाई काही झाले तरी एक हिंदू विधवाच होत्या. त्यामुळे नजरुल इस्लाम यांच्या कुटुंबात सहिष्णुता व अ-सांप्रदायिकता यांचेच वातावरण प्रभावी राहिले. त्यांच्या जीवनपद्धतीवर सनातनी मुस्लिम पद्धतीचा अथवा सनातनी हिंदू पद्धतीचा थोडाही प्रभाव पडला नाही. ही गोष्ट काही मुसलमानांना आवडली नाही. त्यासंबंधी आपण नंतर विचार करणार आहोत. त्यांच्या असमाधानाचे कारण असे की, नजरुल यांनी आपली जीवनप्रणाली व धर्मश्रद्धा यांच्या बाबतीत 'कट्टर' मुसलमान असले पाहिजे, अशी त्यांची अपेक्षा होती. परंतु अखेर लग्न हे लग्न होते; आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे नजरुल हे नजरुल होते–'चंडखोर' आणि 'कवी'! ते आपल्या मित्रांना व वाचकांना अधिकच स्वीकार्य बनले; त्यांचे जास्त लाडके बनले. अशा लोकांकडून कवी व त्यांच्या पत्नी यांच्यांतील प्रेम व धैर्य यांना मान्यता मिळाली; आणि त्या दोघांचे जीवन एकूण विचार करिता सुखाचेच झाले. अर्थात् कालांतराने त्यांच्या जीवनात जी अकल्पित शोकांतिका घडली तिच्या बाबतीत त्यांचे काहीच चालण्यासारखे नव्हते. ही दुर्घटना घडेपर्यंत त्यांचे जीवन सुखासमाधानाचेच होते, असे म्हणता येते. नजरुल हे काही पूर्ण पुरुष नव्हते, हे तर खरेच; परंतु आपली पत्नी व कुटुंब

यांविषयी त्यांना अतोनात प्रेम वाटत होते, त्यांची चिंता ते वाहात राहिले, यात मुळीच शंका नाही. प्रमिला देवींनी आपल्या मृत्यूपर्यंत ( ३० जून १९६२ ) आपल्या पतीवर जी अढळ निष्ठा ठेवली आणि १९३९ सालानंतरच्या भयंकर शारीरिक दुःखांमध्ये व अडचणींमध्ये त्यांची जी सेवा केली ती प्रीतीची व धैर्याची एक विरळाच कहाणी होती.

हुगळीमध्ये त्या छोट्या नवीन बिऱ्हाडाला त्यावेळी आणखी काही गोष्टींची तात्कालिक गरज होती. घर चालवायचे तर रोख पैसा हवा होता. नजरुल हे कधीच सुखवस्तू नव्हते. त्यांच्या पुस्तकांतून व नवीन लिखाणातून मिळणारा पैसा मर्यादित असे. याच्या उलट त्यांचा उदारपणा दुर्गुण ठरावा इतका अधिक होता. कलकत्त्याहून येणाऱ्या पाहुण्यांची वर्दळ चालूच असे. त्यांचे या कुटुंबाकडून प्रेमाने स्वागत केले जाई. परंतु त्यासाठी पैशाची गरज असे, आणि तेवढा पैसा त्यांच्या गाठीशी नसे. संगीताच्या मैफिली चालत, गप्पांचे अड्डे व करमणुकीचे कार्यक्रम होत, आणि त्यांमध्ये दिवस आनंदात जात. परंतु त्यामुळेच नजरुल कुटुंबाची पैशाची ओढाताणही फार होई. १९२५ च्या अखेरीस परिस्थिती अधिकच बिकट झाली. आर्थिक अडचणीत भर म्हणून की काय, नजरुल वारंवार मलेरियाने आजारी पडत. ( नजरुल यांचे जुने मित्र मुजफ्फर अहमद रेग्युलेशन ३ खाली तुरुंगात असल्यामुळे त्यांचाही उपयोग होत नव्हता ). अखेर, ३ जानेवारी १९२६ च्या आसपास कृष्णागरच्या मित्रांनी, विशेषतः हेमंतकुमार सरकार यांनी नजरुल यांचे मन वळवून त्यांना त्यांचे बिऱ्हाड कृष्णागरला हलविण्यास राजी केले.

परंतु या साऱ्या अडचणी असूनही हुगळीतील ते दिवस कविता व राजकीय हालचाली यांच्या बाबतीत मुळीच उणे पडले नाहीत. तेथेच नजरुल गांधीजींना भेटले होते. ती त्यांची पहिली व शेवटची भेट. गांधीजी तुरुंगातून सुटल्यानंतर बंगालच्या दौऱ्यावर गेले असता हुगळीला आले होते. गांधीजींच्या बाबतीत नजरुल यांचे काही मतभेद असले तरी गांधींच्या कार्याला त्यांनी चांगला प्रतिसाद दिला. नजरुल यांचे ' चरख्याचे गीत ' गांधीजींना आवडले होते. नजरुल ते गीत गातही असत. नजरुलनी गांधीजींच्या स्तुतिपर इतरही काही कविता लिहिल्या होत्या. या सर्व कवितांचे मूळ त्या उभयतांच्या या भेटीत होते. परंतु यापेक्षाही अधिक हृदयस्पर्शी व उत्स्फूर्त कविता त्यांनी त्या काळात लिहिल्या. या कविता काव्यगुण आणि संगीतगुण या दोन्ही दृष्टींनी निश्चितच उच्च कोटीच्या होत्या. देशबंधू चित्तरंजन दास यांच्या मृत्यूने त्यांना त्या कविता स्फुरल्या होत्या. २२ जून १९२५ रोजी चित्तरंजनबाबू दार्जिलिंग येथे अकस्मात् निधन पावले; आणि बंगाल शोकसागरात बुडून गेला. नजरुल यांच्या दृष्टीने तो वैयक्तिक आघातही होता. कारण दास कुटुंबाचे त्यांच्यावर खरेखुरे प्रेम होते; आणि ते नजरुलचे चाहातेही होते. नजरुल यांनी आपला शोक अनेक शोकगीतांतून व्यक्त केला. या

कविता 'चित्तनामा' (चित्तपुराण) या स्वतंत्र संग्रहाच्या रूपाने प्रकाशित करण्यात आल्या. याच सुमारास त्यांनी 'झड़' (वादळ) या नावाची एक दीर्घ कविता लिहिली होती. ती नंतर 'बिषेर बाँशी' (विषारी बासरी) या संग्रहात समाविष्ट करण्यात आली. त्यांच्या प्रतिभेला आणखी एक–तिसरा–बहर १९२५ साल संपण्यापूर्वी यावयाचा होता. हा बहर पूर्वीच्या दोन बहरांपेक्षाही उल्लेखनीय ठरणार होता. आणि नजरुल यांच्या राजकीय कल्पना व कार्य यांच्याशी त्याचा प्रत्यक्ष संबंध असणार होता.

आपण पूर्वी पाहिल्याप्रमाणे लेखक या नात्याने १९२१ पासून, आपल्या सुरुवातीच्या दिवसातच नजरुल हे सोव्हिएट समाजवादी पद्धतीकडे आकर्षित झाले होते. त्यांच्या स्वभावातील आदर्शवाद आणि 'स्वातंत्र्य समता व बंधुता' यांविषयी त्यांना वाटणारे सखोल प्रेम यांतून ते आकर्षण निर्माण झाले होते. कारण तोपर्यंत भारतातील फार थोड्या लोकांना सोव्हिएट पद्धती अथवा साम्यवादाचा सिद्धांत व व्यवहार यासंबंधीचे प्रत्यक्ष ज्ञान उपलब्ध झाले होते. असे असले तरी साम्यवादाच्या स्थूल कल्पनेने अनेक तरुण व आदर्शवादी भारतीयांच्या कल्पनाशक्तीला चालना दिली होती. आपण पूर्वी पाहिल्याप्रमाणे नजरुल व मुजफ्फर अहमद यांना साहित्य व काव्य यांनी एकत्र आणले होते. त्यांच्या राजकीय कल्पना आणि सामान्य माणसाविषयी त्यांना वाटणारा जिव्हाळा यांमुळे ते अधिक जवळ आले. आपण भारतात साम्यवाद आणण्यासाठी कार्य केले पाहिजे, याविषयी नजरुल हे आपल्या मित्रांशी सहमत होते. थंड व निश्चयी स्वभावाच्या मुजफ्फर अहमदनी सुमारे १९२२ पासून भारतात साम्यवादी पक्षाची उभारणी करण्यास सुरुवात केली होती. परंतु मार्क्सवादाच्या सिद्धांताची छाननी करणे हे नजरुल यांच्या स्वभावाशी मेळ बसणारे नव्हते. मार्क्सवादाचा सिद्धांत व व्यवहार यांची माहिती मिळविण्यासाठी आवश्यक असणारे मार्क्सवादी साहित्य त्यांना उपलब्ध होऊ शकले असते. परंतु मार्क्सवादी पक्षासारख्या रीतसर संघटनेसाठी धीमेपणाने काम करीत राहाणेही त्यांच्या स्वभावात नव्हते. बहुधा काव्य-गीत-लेखन आणि त्यांच्या सभोवार चालू असलेला तात्कालिक स्वातंत्र्याचा राष्ट्रीय लढा यांविषयी त्यांना वाटणारा आंतरिक ओढा यामुळे मार्क्सवादी सिद्धांत व कार्य यांविषयी विचार करण्यास त्यांना फुरसत मिळाली नसावी अथवा त्यांची मनःप्रवृत्ती तिकडे वळली नसावी. 'धूमकेतु'मधील त्यांच्या लिखाणावरून ते आपल्या उत्स्फूर्त भावनांमध्ये वाहून जात असत असे दिसते. साम्यवादाचा एखादा प्रकार अथवा श्रमिकवर्गाची अशी समजली जाणारी विचार-प्रणाली यांच्यापेक्षा क्रांतिकारक राष्ट्रवाद आणि लोकशाही पद्धतीची क्रांती याच त्यांच्या कार्यप्रेरणा होत्या. परंतु काळ मात्र त्यांची व त्यांच्यासारख्या भारतीय स्वातंत्र्यभक्तांची जणू सत्त्वपरीक्षा करून राहिला होता. 'बार्डोली ठराव'

झाल्यापासून राजकारणात औदासीन्य पसरले होते; आणि स्वराज्य पक्षाच्या सरकारविरोधी संसदीय कार्यक्रमाला ती मरगळ नाहीशी करणे शक्य होत नव्हते. यामुळे नजरुल व त्यांच्यासारखे उत्कट भावनांचे व आतुर वृत्तीचे इतर काही लोक यांना आपल्या भूमिकेचा फेरविचार करण्याची गरज भासू लागली. हे लोक सैद्धांतिक दृष्ट्या समाजवाद्यांच्या बाजूचे होते, एवढे निश्चितच म्हणता येते. त्यामुळे 'चरख्याचे गीत' आणि देशबंधूंच्या निधनाबद्दल शोक व्यक्त करणाऱ्या कविता व गीते (हे लिखाण त्यावेळी मनापासूनच केले गेलेले होते)—लिहिल्या-नंतर नजरुल हे हेमंतकुमार सरकार यांच्यासह 'भारतीय राष्ट्रीय काँग्रेसचा कामगार स्वराज्य पक्ष' स्थापन करण्याच्या कामी एका समाजवादी अथवा जहाल गटात सहभागी झाले, असे आपल्याला आढळून येते.

हा कामगार स्वराज्य पक्ष (लेबर स्वराज्य पार्टी) ही साम्यवादाला अनुकूल अशी संस्था होती. बंगालमध्ये ही अशा प्रकारची पहिलीच संस्था होती. या पक्षाच्या स्थापनेनंतर एक महिन्याने म्हणजे १९२५ च्या डिसेंबरमध्ये 'लांगल' (नांगर) हे त्याचे मुखपत्र प्रकाशित झाले. नजरुल हे त्याचे प्रमुख लेखक व वास्तविक संपादक होते. 'लांगल' ही एक प्राणशक्ती बनावी अशी शुभेच्छा व्यक्त करणाऱ्या दोन काव्यपंक्ती त्याच्याही पहिल्या अंकासाठी कविवर्य टागोरां-कडून मिळाल्या होत्या. हा पहिला अंक (२५ डिसेंबर, १९२५) दुसऱ्या एका कारणामुळे अधिक संस्मरणीय ठरला. त्याने वाचकांना नजरुल यांची 'सर्वहारा' (निर्धन, श्रमजीवी) कवितामालिका दिली. या मालिकेतील प्रत्येक कवितेला 'देव', 'माणूस', 'पाप', 'वेश्या', स्त्री' आणि 'कामगार' ही खास उपशीर्षके होती. ही एक युगप्रवर्तक घटना होती. श्रमजीवी वर्गाच्या सन्मानार्थ प्रथमच उघडपणे कविता लिहिली गेली होती, आणि तिने श्रमजीवी वर्गाला 'सर्वहारा' हे लोकप्रिय व काव्यमय नाव बहाल केले. ही कवितामालिका म्हणजे अन्यायाविरुद्ध जळजळीत आरोपपत्र आहे. तिच्यामध्ये विरोधविकासी भौतिकवादाची चर्चा नसून वस्तुनिष्ठ आदर्शवादाचे विवेचन आहे. तरीपण काव्य या दृष्टीने ती संस्मरणीय आहे. तिच्यात माणसाचे मोठेपण वर्णन केले आहे. 'मानुषेर चेये बड़ किछु नाइ, नहे किछु महीयान्।' (मानवाहून थोर, महान असे जगात काही नाही.) 'लांगल' च्या दुसऱ्या म्हणजे जानेवारी १९२६ च्या अंकात त्यांची 'रुपकेर गान' (शेतकऱ्याचे गाणे) ही कविता प्रसिद्ध झाली. याच सुमारास नजरुल आपल्या कुटुंबासह कृष्णनगरला जाण्याच्या तयारीत होते. तिसऱ्या अंकात त्यांची तितकीच प्रख्यात कविता 'सव्यसाची' (अर्जुन) प्रसिद्ध झाली. या सर्व कविता काव्याचे उत्कृष्ट नमुने होते; आणि मुख्यतः त्यांच्यामुळेच 'लांगल' हे अत्यंत यशस्वी मुखपत्र झाले. 'धूमकेतु'शी तुलना करता 'लांगल' हे कमी जहाल असले तरी ते गोर-गरीब, शेतकरी, कामगार व सर्व दलित-पीडित जनता यांचे पत्र होते. लक्षात

ठेवण्यासारखी दुसरी एक गोष्ट म्हणजे ते नजरुल यांचे स्वतःचे पत्र नव्हते. ते एका राजकीय गटाचे, लेबर स्वराज्य पार्टीचे मुखपत्र होते. त्यावेळी या पक्षाची कचेरी ३७, हॅरिसन रोड (सध्या त्याला महात्मा गांधी मार्ग म्हणतात) या ठिकाणी होती. नजरुल कृष्णनगरला असताना त्यांचा कलकत्त्यातील हाच कायमचा पत्ता होता; आणि त्यांचे समविचारक मित्र त्याठिकाणी नेहमी जमत असत. या लेबर स्वराज्य पार्टीचे कालांतराने बंगालमधील साम्यवादी गटात रूपांतर होणार होते.

१९२६ च्या जानेवारीत नजरुल यांनी आपले बिऱ्हाड कृष्णनगरला हलविले. तेथे त्यांचे पुरोगामी विचाराचे स्थानिक तरुण व हेमंतकुमार सरकार यांसारखे राजकारणी लोक यांनी तातडतोब स्वागत केले. श्री सरकार हे स्वतः बंगालच्या कायदेमंडळाचे स्वराज्य पक्षीय सभासद आणि सुभाषचंद्र बोस यांचे महाविद्यालयात असल्यापासूनचे वैयक्तिक मित्र होते. (यावेळी सुभाषबाबू मंडाल्याच्या तुरुंगात सन १८१८ च्या रेग्युलेशन ३ खाली बंद होते. त्यांच्यावर खटला न भरता त्यांना डांबून ठेवण्यात आले होते). श्री सरकार हे मूळचे महाविद्यालयीन प्राध्यापक, युवक नेते आणि साहित्याची आवड असलेले बुद्धिवंत होते. त्यांच्या विचारसरणीवर समाजवादी विचारांचाही थोडाफार प्रभाव होता. खरे म्हणजे, स्वराज्याच्या चळवळीने जन-आंदोलनाचे स्वरूप धारण करावे, अशी त्यांची इच्छा होती. स्वाभाविकपणेच नजरुल यांच्या अडचणीच्या काळात – विशेषतः जेव्हा मुजफर अहमद हे उपलब्ध नव्हते तेव्हा – त्यांच्याशी त्यांनी मैत्री केली; आणि त्या दोघांनी आपले उद्दिष्ट साध्य करण्यासाठी राजकीय पुढाकार घेण्याचे ठरविले. श्री सरकार आणि त्यांचे कृष्णनगर-मधील मित्र यांनी कृष्णनगरमध्ये अनेक सामाजिक–राजकीय परिषदा आधीच आयोजित केल्या होत्या; आणि त्यांमध्ये नजरुल यांना स्वाभाविकपणेच महत्त्वाचा भाग घ्यावयाचा होता. ६–७ फेब्रुवारी, १९२६ रोजी अखिल बंगाल शेतकरी परिषद् व्हावयाची होती. बहुधा या प्रकारची ही पहिलीच परिषद् असावी. तिच्यासाठी नजरुल यांच्या मदतीची गरज होती; आणि कृष्णनगरला नजरुल यांना उत्तम औषधोपचार मिळाल्यामुळे ते लवकरच खडखडीत बरे झाले; आणि सर्वांपेक्षा अधिक जोमाने कामास लागले. परिषदेचे उद्घाटन-गीत हे स्वाभाविकपणेच नजरुल यांचे 'श्रमिकेर गान' (श्रमिकाचे गाणे) हे होते. या शेतकरी परिषदेतून 'बंगाल शेतकरी व कामगार पक्षा'ची स्थापना झाली. मीरत कम्युनिस्ट खटल्यात (१९२९–३३) या पक्षाचा प्रामुख्याने उल्लेख होणार होता; कारण या पक्षाच्या पायावरच बंगालमधील साम्यवादी संघटनेची उभारणी कालांतराने झाली होती. त्यामुळे 'लांगल' या मुखपत्राचे नाव बदलून ते २५ सप्टेंबर १९२६ रोजी 'गणवाणी' असे करण्यात आले, यात आश्चर्य वाटण्यासारखे काही नव्हते. हे मार्क्सवादाचे पहिले उघड जाहीर झालेले मुखपत्र होते. त्यामध्ये नजरुल यांचा फारसा महत्त्वाचा भाग नव्हता. मुजफ्फर अहमद यांची नुकतीच सुटका झाली

होती; आणि त्यांनीच त्याचा कार्यभार सांभाळला. ते प्रामुख्याने मार्क्सवादी सिद्धांत व राजकारण यांचे गंभीरपणे प्रतिपादन करणारे पत्र होते. नजरुल यांच्या वृत्तपत्रव्यवसायाला साजेसे गरमागरम व साहित्यिक नियतकालिक असे त्याचे स्वरूप नव्हते.

कृष्णनगरमधील इतर परिषदा १९२६ च्या मे महिन्यात व्हावयाच्या होत्या. परंतु त्यावर्षीच्या एप्रिल महिन्यात कलकत्त्याला अचानक हिंदू-मुसलमानांचे दंगे सुरू झाले. हा काहीसा नवाच प्रकार होता–भीषण व अधमपणाचा. कारण हे दंगे शमल्यानंतर पुनः त्यांची तशीच भीषण फेरी झडली. या दंग्यांमुळे जीवितवित्ताची जी हानी झाली तिच्यापेक्षाही अधिक वाईट गोष्ट म्हणजे हिंदू व मुस्लिम समाजातील जातीयवादी वृत्तपत्रांनी, जाणूनबुजून, दुष्ट व विषारी वातावरण निर्माण केले ही होय. त्यामध्ये त्यांचा उद्देश, इतर अनेक गोष्टींप्रमाणे आपला क्षुद्र व्यापारी स्वार्थ साधण्यासाठी जातीयवादी भावनांचा व धर्मवेडाचा उपयोग करून घेणे हा होता. त्यातून जो अविश्वास निर्माण झाला तो तातडतोब नाहीसा होऊ शकला नाही. किंबहुना नंतरही तो दूर होऊ शकला नाही, असे नंतरच्या घटनांवरून दिसून आले. तथापि नजरुल यांची लेखणी जातीयवादाविरुद्ध अविश्रांतपणे लढत राहिली. हा त्यांचा लढा शेवटपर्यंत चालत राहिला. कारण जातीयवादाविरुद्ध संघर्ष हे त्यांच्या जीवनाच्या व कार्याच्या उद्दिष्टांपैकी एक होते. त्यांचा बोचरा उपहास, क्रोध आणि परस्पर स्नेहभाव व देशभक्ती यांसाठी मनापासून केलेले आवाहन यामध्ये कधीच खंड पडला नाही. तरीपण ग्रीष्मऋतूतील त्या महिन्यांमध्ये कृष्णनगरवर बेबनावाची दाट कृष्णछाया पसरून राहिली; आणि तेथील परिषदांवर जातीयवादी विचारांचा पगडा दिसून आला. त्या परिषदांमध्ये भाग घेतलेल्यांमध्ये बहुसंख्य लोक हिंदूच होते; एवढेच नव्हे तर 'मुस्लिम फुटीरवाद' व 'मुस्लिम जातीयवाद' यांसारख्या कल्पनांनी आपला राष्ट्रवाद झाकोळला गेला तरी त्यांनी त्याची फारशी पर्वा केली नाही. अशाच नेत्यांचे तेथे प्राबल्य राहिले. जातीय राजकारणाच्या या गोंधळात टाकणाऱ्या वातावरणापासून नजरुल यांचे अंतःकरण अलिप्त राहिले; आणि त्यांनी आपल्या काही उत्कृष्ट गीतांतून देशभक्ती व जनतेचे स्वातंत्र्य यांचा उदात्त आवाज घुमविला. कृष्णनगरमधील वेगवेगळ्या परिषदांचे उद्‌घाटन त्यांच्या या गीतांनी करण्यात आले.

बंगाली भाषेत देशभक्तिपर गीते विपुल व उदात्त आहेत. परंतु राजकीय परिषदेच्या वार्षिक अधिवेशनाच्या उद्‌घाटनप्रसंगी गायिले गेलेले नजरुल यांचे 'कांडारी हुँशियार' (नावाड्या, सावध राहा!) हे गीत अप्रतिमच म्हणावे लागेल. धारारूत सोडणारी स्वररचना आणि अंतःकरणाला भिडणारे आवाहन या गुणांच्या बाबतीत या कवितेची बरोबरी करू शकेल अशी काव्यरचना क्वचितच आढळेल. या गीताची सुरुवातच अशी आहे :–

दुर्गम गिरि, कांतार, मरु, दुस्तर पारावार।
लंघिते हबे रात्रि निशीथे, यात्रीरा हुँशियार॥

(दुर्गम पर्वत, अरण्ये, वाळवंटे व अफाट समुद्र हे सारे ओलांडून आपल्याला या अंधाऱ्या मध्यरात्री पैलतीराला जावयाचे आहे. तेव्हा हे प्रवाशांनो, हुश्शार !)

यापेक्षाही अधिक उद्दाम स्वर असणारी परंतु इतकीच उदात्त व परिणाम-कारक अशी आणखी दोन समूहगीते नजरुल यांनी यावेळी लिहिली. त्यांपैकी एक विद्यार्थी परिषदेच्या उद्घाटन प्रसंगी गायिले गेले होते. त्यावेळी नेहमीप्रमाणे नजरुल यांनीच त्या समूहगीत-गायनात पुढाकार घेतला होता. विद्यार्थ्यांचे हे समूहगीत संचलन गीत असून त्याचा प्रारंभ असा आहे :–

आमरा शक्ति आमरा बल
आमरा छात्रदल।

(आम्ही शक्ती आहोत, आम्ही सामर्थ्य आहोत. आम्ही विद्यार्थी आहोत.)

उत्साह आणि जोष यांनी भरलेले हे गीत असेच उसळत्या मारीत पुढे धावत जाते. त्याचे भाषांतर करणे अशक्य आहे. तरुणांचे समूहगीत हे काही बाबतीत विद्यार्थ्यांच्या गीतापेक्षा अधिक आवेशपूर्ण आहे. कूच करण्याचे आवाहन त्याच्या या सुरुवातीच्या ओळींमध्येच आहे :—

चल चल चल !
ऊर्ध्व गगने बाजे मादल
निम्ने उतला धरणी-तल
अरुण प्रातेर तरुण दल
चल रे, चल रे, चल !

(पुढे चला, पुढे चला, पुढे चला ! वर आकाशात ढोल वाजत आहे. खाली धरती उतावीळ झाली आहे. लाल प्रभाताच्या हे तरुणानो, पुढे चला, पुढे चला, पुढे चला !)

या तीन राष्ट्रीय गीतांनी इतर काही नाही तरी नजरुल यांना नक्कीच राष्ट्रीय कवी बनविले असते; आणि कृष्णनगरमधील त्यांचा मुक्काम भावी पिढ्यांच्या दृष्टीने संस्मरणीय ठरला असता. परंतु त्या काळात सारे वातावरण इतके खिन्न होते की स्फूर्ती व संघर्ष करण्याचे असे आवेशपूर्ण आवाहनही करणे शक्य नव्हते. जातीय हेव्याचा मार्ग काट्याकुट्यांनी व अडथळ्यांनी भरलेला होता; आणि त्याची गंभीरता नजरुल यांना इतक्या उत्कटतेने जाणवली होती की जातीय ऐक्य व स्नेहभाव निर्माण करण्याचे आपले प्रयत्न थोडेही शिथिल होता कामा नयेत, असे त्यांनी ठरविले. त्यांनी गद्यात व पद्यात जे काही लिहिले त्यातून हृदयद्रावक कारुण्याचा सुगंध दरवळतो. वीस वर्षांनंतर ज्या बंगाली लोकांचा

फाळणी व चिरफाड व्हावयाची होती त्यांचा तो अभिमानास्पद व शोकपूर्ण वारसा आहे. अशा प्रकारच्या संस्मरणीय लिखाणामध्ये 'हिंदू-मुस्लिम युद्ध' हे बोचरे उपरोध-काव्य आणि 'पथेर दिशा' (मार्गाची दिशा) व 'मंदिर ओ मस्जिद' (मंदिर व मशीद) हे गद्य लेख यांचा समावेश आहे.

या ठिकाणी मोहितलाल मजुमदार व नजरुल यांच्यामध्ये झालेल्या वादाचा ओझरता उल्लेख करण्यास हरकत नाही. हा वाद मुख्यतः 'शनिवारेर चिठी' आणि 'कल्लोल' या दोन नियतकालिकांच्या पृष्ठांत गाजला गेला आहे. त्या वादावर बहुधा काही प्रमाणात, त्यावेळी वातावरणात भरून राहिलेल्या जातीय कटुतेचा प्रभाव पडला असण्याची शक्यता आहे.

तो काळ फारच निष्ठुर होता. परंतु नजरुल यांना त्यांच्या साहित्यिक यशांव्यतिरिक्त काही आनंदाचे क्षणही लाभले होते. त्यांचा सर्वात थोरला मुलगा बुलबुल याचा जन्म कृष्णनगरला झाला होता. हा मुलगा अल्पवयातच मरणार होता आणि त्याच्या मृत्यूचा त्याच्या पित्यावर फारच भयंकर वाईट परिणाम व्हावयाचा होता, हे खरे; तथापि त्यावेळी त्याच्या जन्मामुळे एरव्ही कमनशिबी असलेल्या नजरुलना आशेचा एक किरण दिसला होता. नजरुल हे त्यावेळी राजकीय चळवळीत पूर्णपणे रुतले होते; आणि ती चळवळ स्वतःच गोंधळलेल्या अवस्थेत होती. त्यांची आर्थिक दुरवस्था काही केल्या सुधारत नव्हती. त्यांची 'दारिद्र्य' ही कविता या काळातच लिहिली गेली होती. खिन्नता व बंडखोरी यांचे मिश्रण असलेली ती एक उल्लेखनीय कविता आहे. खिन्नता अशासाठी की 'कडाक्याचे दारिद्र्य' त्यांच्या 'आत्म्याचा आनंदी प्रवाह' गोठवून टाकण्याच्या बेतात होते; आणि बंडखोरी अशासाठी की तो प्रवाह गोठून जायला तयार नव्हता. याच्या उलट त्याचे एका जळजळीत जलस्रोतात रूपांतर होईल, असे कवीने ठामपणे जाहीर केले होते. कवीची परिस्थिती निराशापूर्ण बनली होती, असे निदान त्या कवितेवरून तरी दिसत होते. यापुढे कृष्णनगरला जास्त काळ राहून ती सुधारेल अशी आशा त्याला वाटत नव्हती. त्यांनी त्या ठिकाणी गरीब कामगारांच्या मुलांसाठी एक प्राथमिक शाळा स्थापन केली होती. कृष्णनगरला असताना नजरुल यांनी 'कम्युनिस्ट इंटरनॅशनल' या आंतरराष्ट्रीय गीताचे बंगालीत भाषांतर केले होते. बंगालीतील ते पहिलेच भाषांतर होते. अर्थात् त्यांच्या मित्रांना या गीताचे नोटेशन (स्वरलिपी) माहीत नसल्याने नजरुल यांनी लावलेली चाल गाण्याला फारशी उपयुक्त ठरली नाही.

अशाप्रकारे हुगळी सोडून सुमारे अडीच वर्षे झाल्यावर, म्हणजे १९२८ च्या अखेरीस नजरुल यांनी कृष्णनगरला रामराम ठोकला आणि ते आपल्या बिऱ्हाडासह कलकत्त्याला आले. यापुढे कलकत्ता हेच त्यांचे कायमचे निवासस्थान व्हावयाचे होते. प्रारंभी ते शहराच्या मध्यवर्ती भागात असलेल्या पान बाजारात राहू लागले;

आणि मग काही काळानंतर ते शहराच्या उत्तर भागात राहावयास गेले. ते बहुतांशी शामबाजार-बागबाजार भागात राहिले. त्यांच्या आयुष्याचा उत्तरार्ध याच भागात व्यतीत झाला. पुढे १९६० च्या सुमारास त्यांना त्यांच्या मुलासह कलकत्त्याच्या पूर्वभागातील ख्रिस्तोफर रोडवरील सी. आय्. टी. बिल्डिंग्जमधील फ्लॅटमध्ये हलवावे लागले.

कृष्णनगरला असताना नजरुल हे आपल्या राजकीय जीवनाच्या सर्वोच्च शिखरावर होते. आणि त्यांचे आपल्या साम्यवादी मित्रांशी घनिष्ठ संबंध होते. ते कम्युनिस्ट पक्षाचे सभासद नव्हते; त्याची कारणे ओळखणे फारसे अवघड नाही. मार्क्सवादी सिद्धांतांविषयी त्यांना रुची अथवा आवड नव्हती; आणि सामाजिक-आर्थिक समस्यांचे आकलन करून घेणे हे त्यांच्या मार्गात बसणारे नव्हते. किंबहुना राजकीय वाग्युद्धाचेही त्यांना आकर्षण नव्हते. त्यांचा साम्यवाद म्हणजे खराखुरा मानवतावाद होता. पददलितांविषयी त्यांना प्रेम वाटत होते. त्यामध्येही भावुकतेचाच पगडा अधिक असे. शिवाय त्यामध्ये 'ईश्वरी इच्छे' वरील श्रद्धेचाही एक सुप्त स्वर विद्यमान होता, हे आपण अधिक स्पष्टपणे पुढील विवेचनात पाहाणार आहोत. पण ते साम्यवादी असोत अथवा नसोत, त्यांचे आपल्या देशबांधवांवर व स्वातंत्र्यावर अलोट प्रेम होते, हे उघड आहे; आणि म्हणूनच लोकांनी त्यांना 'जनतेचा कवी' म्हणून मान्यता दिली होती, ते योग्यच होते. त्यांना 'कम्युनिस्ट' कवी, असेही लोक म्हणत असत; परंतु ते तितकेसे बरोबर नव्हते.

१९२९ नंतरच्या कलकत्त्यातील नजरुलच्या जीवनात त्यांना एका नव्या जगाचे दर्शन घडणार होते. आता त्यांचे जग – काही विशिष्ट क्षण वगळता – कवितेचे जग न राहाता ते जवळ-जवळ संपूर्णपणे संगीत व भावगीते यांचेच जग बनणार होते. कलकत्त्याला येण्यापूर्वी, म्हणजे १९२९ पर्यंत, नजरुल यांचे अनेक गीतसंग्रह प्रसिद्ध झाले होते. त्याचबरोबर त्यांच्या काव्याची व गद्याची पुस्तकेही प्रकाशित झाली होती. १९२९ पर्यंत नजरुल यांची कवितांची एकूण १४ पुस्तके प्रसिद्ध झाली होती. त्यांमध्ये 'चक्रवाक' ( १९२९ ) या गीतसंग्रहाची व 'संचिता' ( १९२८ ) या कविता-व-गीत-संग्रहाची भर पडली. तरीही त्यांच्या विलक्षण प्रज्ञेने इतर अनेक कविता व गीते यांच्याकडे दुर्लक्षच केले; आणि ते सारे लिखाण वेगवेगळ्या नियतकालिकांत व हस्तलिखितांच्या रूपात विखुरलेले राहिले. कालांतराने त्यांतून दोन संग्रह तयार करण्यात आले. त्यांपैकी 'संचयन' हा संग्रह १९५५ साली व 'मरु-भास्कर' हा १९५७ साली प्रकाशित करण्यात आला. या दोन खंडांच्या संग्रहात व प्रकाशनात नजरुल यांचा स्वतःचा काही हात नव्हता, हे येथे सांगितले पाहिजे. त्यांची वैयक्तिक जबाबदारी बहुधा 'संध्या' ( १९२९ ? ) व 'प्रलय-शिखा' ( १९३९ ? ) या संग्रहांच्या प्रकाशनाबरोबरच संपली असावी, असे दिसते.

नजरुल यांच्या कविता व गीते यांचा पहिला संग्रह 'संचिता'. त्याच्या प्रकाशनाविषयी दोन शब्द सांगितले पाहिजेत. १९२८ साली नजरुल अजूनही आर्थिक अडचणीत होते. खरे म्हणजे ते गरीबच होते. त्यामुळे त्यांनी वैतागाने आणि मागला पुढला काहीही विचार न करिता कलकत्त्याच्या डी. एम्. लायब्ररी या प्रकाशनसंस्थेला आपल्या अत्यंत संस्मरणीय अशा कवितांचा व गीतांचा हा निवडक संग्रह फक्त ३ हजार रुपयांना विकून टाकला. तेव्हापासून 'संचिता'च्या विक्रीपासून मिळणारा सारा नफा कवीला मिळण्याऐवजी प्रकाशकाला मिळू लागला. त्यावेळी नजरुल जेमतेम ३० वर्षांचे होते. ते आपल्या सृजनशील वैभवाच्या काळात वावरत होते; आणि आपण अविचाराने काय हरवून बसलो, याची त्यांना कल्पनाच नव्हती. अर्थात असा क्लेशदायक अडाणीपणाचा व्यवहार करण्याची त्यांची ही काही पहिलीच अथवा शेवटची वेळ नव्हती.

## प्रकरण : पाचवे

# आकाशाचा यात्रेकरू

चौथ्या दशकाच्या सुरुवातीस ( १९३० च्या सुमारास ) नजरुल यांच्या सर्जनात्मक भरारीने त्यांना ज्या दिशेला नेले ती त्यांच्या ओळखीची होती यात शंका नाही. मात्र ती दिशा आतापर्यंत अज्ञात असलेल्या क्षितिजाकडे व अकल्पित नियतीकडे घेऊन जाणारी होती. ते ज्या जगात प्रवेश करणार होते ते संगीताचे जग होते. कविवर्य रवींद्रनाथ टागोरांप्रमाणे नजरुलही जन्मापासूनच संगीताशी बांधलेले होते, असे म्हणता येते. संगीताविषयीचे त्यांचे आकर्षण लहानपणापासूनच उठून दिसत होते. एका अर्थाने हा बंगाली मातीचाच गुण आहे. यामुळेच लोकगीते आणि लोकसंगीत यांच्या बाबतीत बंगाल हा इतका समृद्ध व सम्पन्न आहे; आणि बंगाली साहित्य हे त्यामानाने भावकविता व लघुकथा यांच्या बाबतीत अधिक समृद्ध आहे. बांगला गान ( बंगाली गीत ) हा भारतीय संगीताचा एक खास विभाग असून सामान्यतः त्यामध्ये पुढीलप्रमाणे काही ठळक व तत्संबंधी वैशिष्ट्ये दिसून येतात:– ( अ ) ' कथा '. त्यांमध्ये आवाहनात्मक शब्दरचना असते; ( ब ) ' सूर '. त्यांचे सूर परंपरागत नसतात. कधी ते परंपरागत सुरांमध्ये मिसळलेले असतात. त्यांचे राग ' मिश्र ' अथवा नव्याने शोधून काढलेले असतात; ( क ) त्याचे एकूण स्वरूपच जनतात्मक किंवा लोकात्मक असते. त्याचे आवाहन सर्वसामान्य जनतेला असते; आणि त्याची अंमलबजावणीही जनताच करते.

आपण पूर्वी पाहिल्याप्रमाणे, नजरुल यांनी आपल्या आयुष्याची सुरुवात ' लेटोर दल 'मध्ये म्हणजे लोकगीते गाणाऱ्या व लोकनाट्ये सादर करणाऱ्या एका मंडळीमध्ये पुढारी, गीतकार, संगीतकार व गायक या नात्याने केली. त्यांनी ' कथा ' लिहिली व तिच्यातील गीतांना अनुरूप सूर शोधून काढले. त्यांना बासरी व इतर वाद्येही सहजतेने वाजविता येत. या क्षेत्रातील त्यांच्या अंगच्या गुणांनी ' सियारसोल राजस्कूल 'मधील एक शिक्षक सतीशचंद्र कानजीलाल यांचे लक्ष वेधून घेतले. सतीशचंद्र यांना शास्त्रीय संगीताचे चांगले ज्ञान होते; आणि त्यांनी स्वेच्छेने नजरुलना त्या संगीताचे प्राथमिक धडे दिले. त्यामुळे नजरुल यांच्या उपजत

संगीत प्रतिभेला एक भक्कम पाया मिळाला. त्याचा उपयोग नजरुल यांना त्यांच्या सर्जनात्मक प्रयत्नांमध्ये भावी आयुष्यात खूपच झाला. पुढे त्यांच्या कराचीच्या मुक्कामात त्यांना संगीताच्या इतर पद्धती अवगत करून घेण्याची संधी मिळाली. त्यांच्या सैन्यातील सहकाऱ्यांना त्यांचा सहवास आनंददायक वाटे; आणि त्यांच्याकडून नजरुलना संगीताच्या काही अ-परंपरागत पद्धती जाणून घेता आल्या. त्यांमध्ये पंजाबी ढंगाचे व त्यासारखे इतर सूर होते. त्यांना बहुधा पश्चिम आशियातील ( मध्यपूर्वेतील ) संगीतही थोड्याफार प्रमाणात शिकण्याची व आत्मसात् करण्याची संधी मिळाली असावी. ते कसेही असो, नजरुल जेव्हा कलकत्त्याला परत आले तेव्हा सुरुवातीपासूनच एक उत्साही गायक व नवनवीन गीते लिहिणारा गीतलेखक आणि आपण शोधून काढलेल्या नवीन चालींवर गाणी बसविण्याची अद्भुत प्रतिभा असलेला तरुण या नात्याने स्त्रीपुरुषांच्या वेगवेगळ्या वर्तुळांत त्यांचे चांगलेच स्वागत झाले. काव्यापेक्षा संगीत हेच त्यांना सर्व थरांत प्रवेश मिळवून देणारे पारपत्र ( पासपोर्ट ) बनले. कलकत्त्यात व संपूर्ण बंगालभर त्यांना जी ताबडतोब लोकप्रियता लाभली तिचे हे कारण होते. त्यांचा आवाज काही फारसा चांगला नव्हता. तो भरदार होता यात शंका नाही; परंतु त्यात पुरेशी 'संगीतमयता' नव्हती. तरीपण आपला उत्साह, आवेश, सहजता, स्वाभाविक मनःपूर्वकता आणि अभिव्यक्तीतील जोम यांच्या जोरावर ते आपल्या श्रोत्यांना मंत्रमुग्ध करून सोडीत. सर्व उत्कृष्ट कलांप्रमाणे त्यांच्या गाण्यांमध्ये एक दुर्निवार गुण होता. तुमची इच्छा असो अथवा नसो तो तुम्हांला आपल्याकडे खेचून घेत. हा गुण तीन कारणांमुळे निर्माण झाला होता. पहिले असे की त्यांमध्ये जिवंतपणा व कळकळ असे. दुसरे असे की संपूर्ण ताजेपणा व नवकल्पना यांचा मौलिक गुणधर्म त्यांत असे, आणि तिसरे असे की भावकुता, शब्द आणि सूर यांचा अद्भुत व प्रभावशाली मिलाफ त्यांच्या गाण्यांत असे. असा मिलाफ असल्या-खेरीज टागोरांची गीते ऐकण्यास सरावलेल्या बंगाली श्रोत्यांकडून असा मुक्त मनाचा प्रतिसाद मिळणे शक्य नव्हते. खरे म्हणजे, नजरुल यांच्यातील काव्यसंगीत गुणांची पारख असणाऱ्या रवींद्रनाथांनी नजरुलना संगीताचे पीठ असलेल्या आपल्या शांतिनिकेतनात येऊन राहाण्याचे आणि तेथे अधिक पद्धतशीर प्रशिक्षण घेऊन आपल्या अंगभूत गुणांचा विकास घडवून आणण्याचे निमंत्रण दिले होते. अर्थात् नजरुल हे इतके स्वतंत्र बाण्याचे होते आणि त्यावेळी स्वातंत्र्य–आंदोलनात व राजकारणात ते इतके गुंतले होते की गुरुदेवांच्या त्या निमंत्रणाचा ते स्वीकार करू शकले नाहीत. त्या काळच्या ( १९२१–२३ ) राजकीय सभासंमेलनांमध्ये नजरुल यांनी आपल्या अंगच्या गुणांनी जनतेला भारावून टाकले. १९२२ पासून १९२८ पर्यंत नजरुल यांनी लिहिलेल्या राष्ट्रीय गीतांतील भव्योदात्तता व आवेश यांचा उल्लेख यापूर्वी आम्ही केलाच आहे. त्याचबरोबर इतर भाववृत्तीतून त्यांनी

रचिलेल्या ‘ प्रेम-गीति ’, ‘ प्रकृति-गीति ’ यांसारख्या भावगीतांचे स्मरणही आपण ठेवले पाहिजे. वस्तुतः नजरुल यांनी बंगाली संगीताच्या भवनामध्ये एका नव्या दालनाची भर घालण्यास यापूर्वीच सुरुवात केली होती. त्याचे नाव ‘ गझल ’. ‘ गझल ’ हा मूळचा फारसी काव्यप्रकार. परंतु भारतामध्ये उर्दूने तो आत्मसात् केला होता; आणि हिंदुस्थानी संगीताने त्यांतून एक सुबक कलाप्रकार विकसित केला होता. बंगाली संगीतात गझलचा प्रवेश घडवून आणणारे नजरुल हे पहिलेच कलावंत. ‘ गझल ’शी संबंधित तरल भावनांची अभिव्यक्ती करण्यासाठी त्यांनी शब्दांची निवड चोखंदळपणे केली आणि त्यामुळे त्याच्या सुरांना अधिक सामर्थ्य व वजन प्राप्त झाले. अशाप्रकारे १९२६ पर्यंत नजरुल हे बंगाली संगीताच्या क्षेत्रात एक सर्जनशील कलावंत म्हणून मान्यता पावले होते. १९२८ पर्यंत या क्षेत्रातील त्यांचा अधिकार सर्वमान्य झाला होता. त्यांच्या गीत-संग्रहांपैकी पहिला संग्रह ‘ बुलबुल ’, बऱ्याच विलंबाने, १९२८ साली प्रसिद्ध झाला. त्याच्या पाठोपाठ ‘ चोखेर चातक ’ ( नेत्र-चातक, १९२९ ) व ‘ नजरुल गीतिका ’ ( १९३० ) हे दोन संग्रह प्रकाशात आले. ही भावगीते हां-हां म्हणता सबंध बंगालभर पसरली. नजरुल आता आकाशात अधिक उंच भरारी मारण्याच्या तयारीत होते. शेलेच्या स्कायलार्कप्रमाणे ते ‘ आकाशयात्री ’ बनणार होते.

या विकासाला किंवा घडामोडीला एक पार्श्वभूमी आहे. १९२८ पर्यंत नजरुलना आपले काव्य व गद्य यांच्या साह्याने आर्थिक निश्चितता लाभू शकली नव्हती. त्याच्या आधी एका ब्रिटिश ग्रामोफोन कंपनीने महत्प्रयास करून विशाल भारतीय बाजारपेठेचा अंदाज घेण्यास सुरुवात केली होती. अर्थात् त्यामध्ये तिला भरपूर नफा मिळविण्याचीही आकांक्षा होती. कलकत्त्याची ‘ दि रेडियो कंपनी ’ ( आकाशवाणीचे मूळ रूप ) ही अजून एक खासगी कंपनी होती व ती जगण्याची धडपड करीत होती. तथाकथित ‘ फिल्मी ’ संगीत अजून उद्यास यावयाचे होते. ब्रिटिश ग्रामोफोन कंपनीला या ‘ बंडखोर कवी ’च्या गाण्यांतील राजकीय आशयाची पुरेपूर कल्पना होती. तरीपण त्यांची चाणाक्ष व्यावसायिक दृष्टी आणि नफ्याची प्रेरणा यांचा हळूहळू जय झाला; आणि नजरुल व त्यांचे साम्राज्यशाही-विरुद्ध चाललेले धर्मयुद्ध याविषयीचे कंपनीचे पूर्वग्रह शिथिल पडले.

ती सारी घटना प्रत्यक्षतः अशी घडली : हरेन घोष या प्रख्यात गायकाने हिज मास्टर्स व्हॉइस कंपनीसाठी गायिलेली दोन भावगीते नजरुलची होती. मात्र कंपनीला त्याची कल्पना नव्हती. ती ध्वनिमुद्रिका अत्यंत लोकप्रिय झाली व कंपनीला भरपूर प्राप्ती झाली. कंपनीला स्वाभाविकपणेच नजरुलच्या गीतांची लोक-प्रियता आजमावून पाहाण्याचा मोह झाला; आणि त्यानंतर लौकरच नजरुलच्या आणखी काही गीतांच्या ध्वनिमुद्रिका बाजारात आल्या. त्यांपैकी काही गीते प्रथम कंपनीच्या पगारी गायकांनी गायिली होती; आणि मग स्वतः नजरुलनी गायिलेली

गीते ध्वनिमुद्रित झाली. या ध्वनिमुद्रिकांपासून मिळणारी रॉयल्टीची रक्कम नजरुल यांना त्यांच्या पुस्तकांबद्दल व अन्य लिखाणांबद्दल मिळणाऱ्या मोबदल्याशी तुलना करिता पुष्कळच मुबलक होती. नजरुल व त्यांच्या ध्वनिमुद्रिका यांची अफाट लोकप्रियता पाहून कंपनीने नजरुलना नोकरीच दिली. कंपनीमध्ये नजरुल यांना अत्यंत आदराने व सन्मानाने वागविले जाई. कंपनीशी असलेल्या आपल्या संबंधाविषयी नजरुल यांच्या मनातही काही नावड नव्हती. संगीत हे त्यांचे आराध्य दैवत होते. पैसा आजवर त्यांच्याशी लपंडाव खेळत होता. त्याच्याविषयी आसक्ती नसली तरी अभिलाषा नक्कीच होती. कंपनीच्या नोकरीत असलेले संगीतज्ञ उस्ताद् झियाउद्दीन खान यांच्याकडून नजरुल यांनी तज्ज्ञांचा सल्ला घ्यावा अशी कंपनीच्या अधिकाऱ्यांची इच्छा होती. ही संधी घेण्यास नजरुल उत्सुकच होते. त्यांनी उस्तादांकडून शास्त्रीय संगीताविषयी सांगोपांग प्रशिक्षण घेतले. त्या दोघांमधील संबंध इतके घनिष्ठ व जिव्हाळ्याचे बनले की नजरुल यांनी 'बन-गीति' (१९३२) हा आपल्या गीतांचा संग्रह उस्ताद् झियाउद्दीन खान यांना अर्पण केला. ते संगीत विषयात इतके तरबेज झाले की उस्ताद् झियाउद्दीन खान यांच्या मृत्यूनंतर एच्. एम्. व्ही. ने त्यांच्या जागी कंपनीचे प्रशिक्षक व प्रमुख संगीतकार म्हणून नजरुल यांची नेमणूक केली. इतर ग्रामोफोन कंपन्या, रेडियो व चित्रपट निर्माते यांनीही या क्षेत्रातील नजरुल यांचे श्रेष्ठत्व मान्य केले आणि ते त्यांची मदत घेऊ लागले.

नजरुल यांनी त्यांना मिळालेला पैसा व अधिकारपद यांचा भरपूर उपयोग करून घेतला. काही काळपर्यंत नशीब (पैसा) व काम आनंदाने एकमेकांच्या हातात हात घालून चालत राहिले. लौकरच नजरुल यांनी स्वतःसाठी एक नवी कोरी क्रिस्लर कार विकत घेतली. ती एक मोठीच चैन होती. त्याकाळी कोणाही कलावंताला अशी चैन परवडणे शक्य नव्हते. नजरुल यांचे मित्र त्यांच्याबरोबर त्यांच्या गाडीतून आनंदाने फिरत; आणि नजरुल यांनाही आपल्या मित्रांना आपल्या सुखात सहभागी करून घेण्यात आनंद वाटे. जो माणूस सर्वसामान्य मानदंडाप्रमाणे गरीब समजला जात असतानाही वैपुल्य, चैतन्य व औदार्य यांचा पुतळा समजला जात होता त्याला आता मुक्तहस्ताने मेजवान्या व आनंदोत्सव साजरे करण्याचा मोह होणे स्वाभाविक होते; आणि स्वतःजवळचा शेवटचा पैसा खर्च होईपर्यंत त्याने लोकांना भरपूर खाऊ-पिऊ घातले. कारण ज्यावेळी गरज लागेल त्यावेळी आपण मुबलक पैसा मिळवू शकू असा त्याला पूर्ण आत्मविश्वास होता.

तथापि त्यांचे हे सुदैव अल्पकाल टिकणार होते. पहिला आणि अत्यंत शोकपूर्ण फटका त्यांना दैवाकडून बसला. नजरुल यांचा सर्वात मोठा मुलगा बुलबुल साडेतीन वर्षांचा असताना देवीच्या आजाराने अकस्मात् वारला (७–८ मे १९३४) तो मुलगा अत्यंत हुशार व साऱ्या कुटुंबाचा लाडका होता. या घटनेने

त्याच्या पित्याच्या जीवनात एक वेगळा कालखंड सुरू केला. त्या आघातापासून नजरुल कधीच सावरले नाहीत. त्यांच्या जीवनावर व कार्यावर या घटनेचे काय परिणाम झाले ते आपण योग्य त्या संदर्भाच्या वेळी पाहाणारच आहोत. त्यांच्या सर्जनशक्तीची गुणवत्ता या घटनेने कमी झाली नाही हे खरे; तरीपण तिने वेगळे मार्ग अंगीकारले; आणि ती अवघड शोध घेण्यात गढून गेली. मृत्यू, मरणोत्तर जीवन, धर्म आणि गूढज्ञान यांविषयीच्या समस्यांवर ते विचार करू लागले. तथापि, संगीताने नजरुल यांची सोबत पुढेही बराच काळपर्यंत–१९४२ साली त्यांचा मेंदू निकामी होईपर्यंत सोडली नाही.

नजरुल यांच्या सांगीतिक प्रज्ञेची उत्स्फूर्तता व सुपीकता किंवा बहुप्रसवता यांचा त्यांच्या मालकांना नेहमीच चांगला उपयोग झाला. परंतु एका अर्थाने, तत्कालीन परिस्थितीत, त्यांचे हे गुणच त्यांच्या स्वतःच्या अपव्ययाला कारणीभूत होणे अपरिहार्य होते. एका बाजूने बुलबुलच्या निधनाचा त्यांना बसलेला धक्का आणि दुसऱ्या बाजूने कंपनीकडून त्यांच्यावर सतत येणारे दडपण यामुळे अनेकदा त्यांच्या निर्मितीमध्ये बेफिकिरी येऊ लागली. शिवाय उत्पादनाचा जो अखंड लोंढा सुरू झाला होता त्याचे पुढे काय होते याची चौकशी करण्याची फिकीर नजरुलनाही राहिली नाही व कंपनीलाही भासली नाही. त्यांच्या ज्या ध्वनि-मुद्रिका विक्रीसाठी बाजारात आल्या होत्या त्यांचे नीट जतनही करण्यात आले नाही; किंवा त्यांची तालिका ( सूची ) ही तयार केली गेली नाही. त्यामुळे नजरुल यांनी ज्या सुमारे ३५०० गीतांचे लेखन केले आणि त्यांना चाली लावल्या त्यांपैकी बहुसंख्य म्हणजे सुमारे २ हजार गीतांचा माग काढणेही जवळ-जवळ अशक्य होऊन बसले आहे. त्यांच्या या गीतांपैकी अगदी मोजकीच गीते त्यांच्या 'बुलबुल' ( १९२८ ), 'चोखेर चातक' ( १९२९ ), 'नजरुल गीतिका' ( १९३० ), 'सुर-साकी' ( १९३१ ), 'झुलफिकार' ( १९३२ ), 'बन-गीति' ( १९३२ ), 'गुलबागीचा' ( १९३३ ), 'गीति-शतदल' ( १९३४ ) 'सूर-महल' ( १९३४ ), 'गानेर माला' ( १९३४ ), इत्यादी गीतसंग्रहांतून प्रकाशित झाली. जी राष्ट्रीय गीते विशेष लोकप्रिय होती ती वगळता इतर गीतांकडे दुर्लक्ष करण्यात आले; आणि लौकरच लोकांना त्यांचा विसर पडला. नजरुल यांच्या गीतांचा अधिक परिपूर्ण संग्रह तयार करण्याचे प्रयत्न झाले; परंतु ते अगदीच अस्ताव्यस्त स्वरूपाचे होते. जसजसा काळ लोटतो आहे तसतशी ही गीते मिळविणे अधिकाधिक दुष्कर होत आहे. अजहरउद्दीन खान यांनी काही वर्षांपूर्वी मोठ्या परिश्रमाने प्रशंसनीय धडपड केली; आणि सुमारे १६०० ते १७०० गीतांची एक सूची तयार केली. तिच्यामध्ये प्रत्येक गीताचा पहिला चरण देण्यात आला होता. तथापि, ही सूची परिपूर्ण बनविण्यासाठी त्यानंतर इतर कोणीही खटपट केली नाही.

नजरुल यांच्या गीतांची संख्या ( ३५०० ) ही तर प्रचंड होतीच; पण

त्यांतील विषयांचे वैविध्यही थक्क करून सोडणारे आहे. विषयांच्या बाहुल्याप्रमाणे त्यांच्या चालींमध्येही खूप विविधता आहे. विषयांनुसार त्यांच्या गीतांचे खालील-प्रमाणे वर्गीकरण करता येते :–

१. ' स्वदेशी गान ' : यांमध्ये सर्व प्रकारच्या सार्वजनिक विषयांचा समावेश होतो. त्यांत केवळ स्वातंत्र्याशी व स्वातंत्र्यलढ्याशी संबंधित राष्ट्रीय गीतेच येतात असे नाही तर ' कृषकेर गान ', ' श्रमिकेर गान ' यांसारख्या राजकीय-सामाजिक विषयांचाही त्यांत अंतर्भाव होतो.

२. ' प्रेम गीति ' : या प्रेमगीतांमध्ये एक खास प्रकार म्हणून गझलांचा समावेश करण्यात आला पाहिजे.

३. ' प्रकृति गीति ' : सर्वसामान्यपणे निसर्ग-गीते.

४. ' अध्यात्म गीति ' : या आध्यात्मिक गीतांमध्ये वेगवेगळ्या प्रकारांचा समावेश होतो. उदाहरणार्थ, सर्वांनाच आपलीशी वाटणारी, शाक्त अथवा वैष्णव परंपरेतील, इस्लामविषयक, अथवा गूढवादी–( सूफी, वेदांती वगैरे )–गीते.

५. 'कौतुक गीति' : हलकी-फुलकी व विनोदी गाणी. यांमध्ये उपरोधात्मक (राजकीय किंवा सामाजिक) अथवा साध्या, मजेदार विनोदी गाण्यांचा समावेश होतो.

६. ' विविध गीति ' : विविध प्रकारची गीते. ज्यांचे सहजासहजी वर्गी-करण करता येत नाही अशा अनेक गीतांचा या प्रकारात समावेश होतो.

नजरुल यांच्या गीतांचे, किंबहुना ज्याला ' बांगला गान ' असे म्हणतात त्या बंगाली गाण्यांचे रसग्रहण करण्यासाठी सौंदर्यशास्त्रातील विद्वान अथवा संगीताच्या सिद्धांतांचा व तंत्राचा जाणकार असण्याची गरज नाही. अर्थात् तज्ज्ञ व टीकाकार मंडळी आपापल्या दृष्टिकोनातून ते कार्य करीत असतात, यात शंका नाही. परंतु बंगालमधील अथवा भारतातील सामान्य लोकांची स्वतःची अशी एक मोजमापपट्टी असते आणि त्यांच्याजवळ मूल्यांची एक जाणीव असते. या दोन्ही गोष्टी पुष्कळच समर्पक असतात. त्यांना नजरुलची गाणी आवडतात; आणि त्यांचे आगळेपण ओळखण्याची पारखही त्यांच्याजवळ असते. उदाहरणार्थ, बंगालीमध्ये उत्कृष्ट राष्ट्रीय गीते आहेत. ती शास्त्रीय संगीतामध्ये गायिली जातात, आणि हलक्या-फुलक्या लोकप्रिय चालीत रचलेली गाणीही त्यांत आहेत. या राष्ट्रीय गीतांचे दालन रवींद्रनाथ टागोर व द्विजेंद्रलाल राय यांच्या कलाकृतींनी जसे सुशोभित झालेले आहे तसेच अलीकडील काळातील काही मोजक्या अशा इतर कवींनी रचलेली गीतेही त्यात आहेत. या क्षेत्रातील नजरुल यांनी घातलेली अनन्यसाधारण भर म्हणजे त्यांची संचलन-गीते किंवा कूचगीते ही होय. या गीतांसंबंधी सुभाषचंद्र बोस एकदा म्हणाले होते की, " ही गीते आपल्या राष्ट्रीय सैन्याला आघाडीकडे

कूच करण्यास प्रेरणा देतील.' उदाहरणार्थ, ' दुर्गम गिरि कांतार मरु ' अथवा ' कारार ओइ लौह कपाट भेंगे फेल, करे लोपाट ', अथवा ' एइ शिकल परा छल आमादेर शिकल परा छल ' अथवा ' आमरा छात्र दल ' अथवा ' ऊर्ध्व गगने बाजे मादल ' यांसारख्या राष्ट्रीय गीतांचे स्मरण म्हणजे या देशाने १९२० पासून १९४७ पर्यंत जे आगेकूच केले होते त्याचेच स्मरण होय. नजरुल यांनी ही गीते लिहून त्यांना चाली लावण्याखेरीज दुसरे काहीही केले नसते तरीही ते आमच्या राष्ट्रीय गीत-लेखकांमधील सर्वांत अधिक स्फूर्तिदायक व लोकप्रिय गीतकार ठरलेच असते. अर्थात त्यांनी या प्रकारची इतरही गीते लिहिली होती. त्यांतील उपरोध व फटकारे अत्यंत परिणामकारक होते. ' डोमीनियन स्टेटस ' ( वसाहतीचे स्वराज्य ), ' पॅक्ट ' (करार), ' दे गोरुर गा धुये ' यांसारखी या प्रकारात मोडणारी त्यांची गीते तितकीच राष्ट्रीय महत्त्वाची होती. अशा प्रकारची गीते छापलेली पुस्तके वारंवार जप्त होत. परंतु ती एकाच्या तोंडून दुसऱ्याच्या तोंडी जात-जात सबंध बंगाल व्यापून टाकीत.

ही गीते प्रसृत होत असतानाच तिसऱ्या दशकाच्या मध्यास नजरुल यांच्या ' गझलां 'नी बंगाली लोकांना मंत्रमुग्ध करून सोडले. हा काव्यप्रकार नवीन व अद्वितीय होता. त्यातून कवीच्या सर्जनशीलतेचाच प्रत्यय येत होता असे नव्हे तर बंगाली भाषा प्रसंगी कशी लवचिक बनू शकते याचाही पुरावा त्याने दिला.

या गझलांतील काव्यगुण, डौल व लालित्य यांची गोडी अगदी अवीट आहे. ' आमारे चोख इशाराय डाक दिये जाय कोन से दरदी ' ( मला डोळ्यांच्या इशाऱ्याने कोण बरे, समदुःखी बोलावीत आहे ! ), ' एतो जल ओ काजल-चोखे ' ( डोळ्यात काजळ घालून हे पाषाणी, तू इतके पाणी कशाला आणलेस ! ), ' बागिचाय बुलबुलि तुइ फूल-शाखाते ' ( बगीचातील फुलांच्या फांदीवरील तू बुलबुल पक्षिणी आहेस ), ' करुण कॅनो अरुण आँखि ' ( हे अरुण नेत्र करुण का आहेत ! ), ' केउ भोले ना केउ भोले ' ( कुणालाही, कुणालाही विसर पडू नये ). या गझलांचा नमुन्यादाखल उल्लेख करता येईल.

' झुलफिकार ' ( १९३२ ) या संग्रहाने धार्मिकता व आध्यात्मिकता यांचा एक नवा सूर छेडला. या संग्रहातील गीते इस्लामी प्रेरणेशी संबंधित आहेत. या गीतांचे आवाहन तीव्र व सखोल होते. ती भक्तिरसपूर्ण, सरळ हृदयाला भिडणारी व गंभीर होती. अर्थात हिंदू व मुसलमान यांच्या आध्यात्मिक व धार्मिक भावना त्यांत वेगवेगळ्या मार्गांनी व्यक्त झाल्या. चौथ्या दशकात नजरुल यांनी रचलेली भक्तिगीते व गूढवादी गाणी हीच त्यांची प्रमुख देणगी होती. त्यांमध्ये स्वर व वृत्ती, रचना व मिश्रणे यांचे वैविध्य थक्क करून सोडणारे होते. तथापि नजरुल यांच्यामध्ये असलेला जीवन, स्वातंत्र्य व हास्य यांविषयीचा दुर्दम्य जोम त्यांच्या मेंदूला ग्रहण लागेपर्यंत कायम होता. ' चंद्रबिंदु ' ह्या त्यांच्या गीतसंग्रहाची जप्ती

बराच काळपर्यंत राहिली. कारण तत्कालीन ब्रिटिश अधिकाऱ्यांना त्यातील उपरोधिक व हास्योत्पादक गीते पचविणे फार कठीण गेले.

सौंदर्यविषयक आनंद अनुभवण्यासाठी तांत्रिक बाबी अत्यावश्यक समजल्या जात असतील तर नजरुल यांच्या गीतांचे तज्ज्ञ-मूल्यमापन त्यांतील विशेषज्ञ, संगीत-समालोचक व संगीतज्ञ यांच्यावर सोपविण्यास हरकत नाही. सर्वसामान्य लोकांनी आणि गंभीर संगीतप्रेमी मंडळींनी त्यांच्या श्रेष्ठत्वाचा आनंद अनुभाविला आहे; आणि ती कसोटी मान्य होण्यास प्रत्यवाय नसावा. जोपर्यंत एखादे गीत एखाद्या सिद्धहस्त संगीतकाराकडून सुरांच्या रूपात प्रत्यक्ष कानावर पडत नाही तोपर्यंत त्याचे श्रेष्ठत्व अथवा कनिष्ठत्व सिद्ध होत नाही. लिखित किंवा मुद्रित शब्दांमध्ये ते सामर्थ्य नसते. नजरुल यांची सुयोग्य गायकांनी गायिलेली जी गीते ध्वनिमुद्रिकांच्या रूपाने अजूनही उपलब्ध आहेत ती वाचकांनी ऐकली तर त्यांना त्यांचे रसग्रहण अधिक उत्तम प्रकारे करता येईल, याची आम्ही खात्री देतो. मात्र येथे हेही सांगितले पाहिजे की नजरुल यांच्या गीतांतील तांत्रिक बाबीही असामान्य असल्याचा तज्ज्ञांनी निर्वाळा दिला आहे. आपल्या गीतांना चाली लावताना त्यांची सहजप्रवृत्ती व सौंदर्यविषयक नैसर्गिक जाणीव हेच त्यांचे खात्रीचे मार्गदर्शक असत. परंपरागत पद्धतीच्या ठराविक नियमांच्या चाकोरीतून ते जात नसत. त्यांच्यामध्ये अभिजात संगीतातील राग आणि लोकगीतांचे सूर यांचा नेहमीच मधुर मिलाफ होत असे. त्यामुळे एखादे विशिष्ट गीत केवळ आकर्षकच बने असे नव्हे तर ते अगदी खास त्यांचे बनून जाई. याची असंख्य उदाहरणे देता येतील. अर्थात 'शुद्धिवाद्यां'नी अशा प्रयोगाविरुद्ध काहूर माजविले, हे खरे; परंतु नजरुल हे बंडखोर कवी होते; आणि त्यांचा बंडखोरपणा संगीताच्या क्षेत्रातही तितक्याच आवेशाने घुसत असे. आता त्या बंडखोराला सर्जनशील कलावंत म्हणून सर्वांनी मान्यता दिली आहे.

शिवाय, नजरुल हे सामान्य जनतेतून आलेले होते. त्यामुळे लोकप्रिय संगीत आणि लोकसंगीताचे वेगवेगळे प्रकार स्वाभाविकपणेच त्यांना आवडत होते. त्यामुळे खास बंगाली संगीताचा ढंग असणारे 'कीर्तन' (याचे उच्च व सामान्य असे संप्रदायही आहेत), पूर्व बंगालमधून उदयास आलेली 'भाटियाली', 'जारी' व 'सारी' हे पूर्व बंगालच्या संगीताचे आणखी दोन प्रकार, गूढवादी 'बाउल' गाणी, उत्तर बंगालची 'भाओइया' ही प्रेमगीते, सूफी पद्धतीची 'मुर्शिदा' गाणी, 'रामप्रसादी' ही हिंदू भक्तिगीते, अथवा पश्चिम बंगालच्या लोकगीतांचा 'झुमुर' हा काव्यप्रकार–यांपैकी प्रत्येकाचे आणि इतर लोकगीतांच्या प्रकारांचे नजरुल यांच्या सर्जनशीलतेला आकर्षण वाटत होते. या संदर्भात उदाहरणादाखल नजरुल यांच्या काही गीतांचा उल्लेख करिता येईल. कीर्तन :– 'आमि कि सुखे लो गृहे रबो'; बाउल : – 'आमि ख्यापा बाउल, आमार देउल आमारि एइ आपन देह';

भाटियाली :– ' ओरे माझी भाइ, तुइ कि दुःख पेय कुल हाराले अकुल दुनियाय ' वगैरे.

खरोखरी, नजरुल यांनी आपल्या अशा काही नवीन चाली शोधून काढल्या आणि त्यांना ' निर्झरणी ', ' संध्यामालती ', ' बन-कुंतल ', ' दोलन-चंपा ' यांसारखी काव्यमय नावे दिली.

नजरुल यांच्या गीतांचे संपूर्ण क्षेत्र दिवसेंदिवस आटोक्याबाहेर जात चालले आहे. कारण त्यांची एकत्रित नोंद ठेवण्यात आलेली नाही, अथवा ती सुरक्षित ठेवण्याचे काही प्रयत्नही केले जात नाहीत. तरीपण जी काही उपलब्ध आहेत त्यांवरून निश्चितपणे असे दिसून येते की,

१. नजरुल यांचे ओजपूर्ण व वीरश्रीयुक्त गीते, विशेषतः संचलन गीते लिहिण्यात अद्वितीय प्रभुत्व आहे.

२. ते एक उत्कृष्ट नवप्रवर्तक आहेत. त्यांनी ' गझल ' हा नवा प्रकार आणून बांगला गान समृद्ध बनविले.

३. धार्मिक व भक्तिविषयक संगीताच्या जगात नजरुल म्हणजे एक अद्वितीय नमुना आहे. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे श्यामा-संगीत व इस्लामी भक्तिसंगीत यांमध्ये आध्यात्मिक समन्वय साधण्याचा प्रयत्न करून त्यांनी खास भारतीय प्रतिभेची चमक दाखविली आहे.

४. काही मोजकीच नावे घ्यावयाची तर रवींद्रनाथ टागोर, अतुल प्रसाद सेन, रजनीकांत सेन यांच्याप्रमाणे बांगला गानाच्या क्षेत्रात नजरुल हे प्रमुख सर्जनशील कलावंत असून त्यांनी भावी पिढ्यांसाठी फार मोठा वारसा ठेवला आहे.

नजरुल यांची गीते अधिकाधिक लोकांना माहीत व्हावीत यासाठी ज्यांनी एकेकाळी हातभार लावला अशा ठळक कलावंतांमध्ये कुमार सचिनदेव बर्मन, दिलीपकुमार राय, अब्बासुद्दीन, कमल दासगुप्त, धीरेंद्रचंद्र मित्र, संतोष सेनगुप्त, सुप्रभा सरकार, फिरोजा बेगम इत्यादी नावे उल्लेखनीय आहे.

कवी नजरुलपेक्षा संगीतकार नजरुल अधिक श्रेष्ठ आहेत या समजुतीत काहीतरी तथ्य असले पाहिजे. काव्यामध्ये त्यांचा ओघ पुष्कळदा त्यांच्याबरोबर वाहवत गेला आहे. परंतु त्यांच्या गीतांमध्ये मात्र ते अत्यंत स्वाभाविक स्वरूपात आणि अत्यंत उत्कृष्ट स्वरूपात टिकून राहिले.

## प्रकरण : सहावे

# तुटलेल्या पंखांवर

१९२९ साली सर्वोच्च सर्जनशील कलावंत या नात्याने नजरुल यांचे स्थान संगीत विश्वाच्या व्यावसायिक क्षेत्रात सुरक्षित झाले होते. त्यांच्या आयुष्यात आता कसलीही ददात उरली नव्हती; आणि आर्थिकदृष्ट्या ते चांगलेच सुस्थिर बनले होते. त्यांना एव्हाना दोन मुलगे झाले होते आणि लौकरच तिसरे अपत्य होणार होते. त्यांच्या सासूबाई गिरिबालादेवी घरातील सगळ्या गोष्टींची मन लावून व कर्तबगारपणे काळजी घेत असल्याने नजरुलना अथवा त्यांच्या पत्नीला घरच्या व्यवस्थेबद्दल कसलीच चिंता करावी लागत नव्हती. आपण पूर्वी पाहिल्याप्रमाणे नजरुल यांचे पाऊल पुढे पडणार होते. कारण ' सेनोला ' व ' मेगॅफोन ' यांसारख्या इतर ग्रामोफोन कंपन्या एच. एम्. व्ही. प्रमाणे नजरुलची सेवा मिळविण्यास उत्सुक होत्या. दि रेडियो कार्पोरेशनही नजरुलची सेवा व संगीत विकत घेण्याची तयारी करीत होती. कलकत्ता व मुंबई येथील चित्रपट जगतानेही अधूनमधून त्यांचा उपयोग करून घेण्यास सुरुवात केली होती. ( उदाहरणार्थ फझली ब्रदर्स कंपनीने आपल्या ' चौरिंगी ' या चित्रपटासाठी नजरुलची गाणी मिळविली होती. अर्थात् त्या गाण्यांची संपूर्ण रक्कम त्यांना देण्यात आली नव्हती. ) त्यांनी काही नाटके लिहिली होती आणि त्यांतील गाणी त्यांनी स्वतःच रचली होती. आपल्या एका नाटकात त्यांनी १९३१ साली कामही केले होते असे म्हणतात. ' ध्रुव ' नावाच्या चित्रपटातही त्यांनी भूमिका केली होती, असे सांगतात. परंतु नाट्यसृष्टी हे बहुधा त्यांचे क्षेत्र नसावे. विशेषतः त्यावेळी मृत्यूमुळे घडलेले वियोग आणि मानसिक गोंधळ यांमुळे त्यांचा स्वाभाविक उल्हास मंद पडत चालला असताना त्या क्षेत्रात त्यांना विशेष कर्तबगारी करून दाखविणे शक्य झाले नसावे.

त्यांना जो पहिला धक्का बसला तो १९३० साली त्यांचा थोरला मुलगा ( जन्म : १९२६, कृष्णनगर येथे ) बुलबुल याच्या निधनाचा. नजरुल यांनी त्या मुलाच्या जन्मानंतर १९२८ साली प्रसिद्ध झालेल्या आपल्या पहिल्या गीतसंग्रहाला त्याचे नाव दिले होते. बुलबुल हा नजरुल यांचा नेहमीच लाडका शब्द राहिला

होता; आणि त्यांच्या मुलाने त्या शब्दाला अधिकच प्रिय बनविले होते. त्या मुलासंबंधी जी माहिती मिळते तिच्यावरून तो अत्यंत हुशार व सर्वांचा लाडका होता. मुजफ्फर अहमद यांच्यासारखे मित्रही, इतक्या दशकांनंतर देखील, त्याची आठवण सद्गदित वात्सल्याने काढतात. तो मुलगा देवीच्या आजाराने अल्प-मुदतीत निधन पावला. तो सर्व काळ त्याचे वडील आपल्या मुलाचा हात हातात घेऊन त्याच्या अंथरुणाशी बसून राहिले. सारे कुटुंब शोकसागरात बुडून गेले; आणि कविवर्य पित्याला तर तो धक्का सर्वांहून अधिक जाणवला, असे नंतरच्या घटनांवरून दिसून येते. किंवा बहुधा अतिशय भावनाप्रधान व अत्यंत संवेदनशील असल्यामुळे नजरुल यांना तो आघात सहन करणे शक्य झाले नसावे. किंबहुना त्या धक्क्यातून ते कधीच सावरले नाहीत. मानसशास्त्रज्ञ ज्याला ' बहिर्मुख व्यक्तित्व ' असे म्हणतात तशा प्रकारची जडणघडण नजरुल यांची होती. त्यांच्यांतील अफाट जीवनशक्ती व भावनाप्रधानता, सळसळता उत्साह आणि सुस्वभाव यांमुळे सर्वजण त्यांच्याकडे आकर्षिले जात. ते रसरशीत व्यक्तित्व आता मुळातून हादरले होते. बाह्यतः त्यामुळे त्यांचे काम पूर्णपणे थंडावले नव्हते. त्या आघाता-नंतरच्या काही दिवसांत त्यांनी स्वतःला सावरण्याचा व गीतरचना करण्याचा आपला कार्यक्रम पुनः सुरू करण्याचा त्यांनी प्रयत्न केला. त्यावेळी छापल्या जात असलेल्या ' चंद्रबिंदू ' या आपल्या गीतसंग्रहाची मुद्रिते तपासण्याच्या कामालाही त्यांनी अधूनमधून स्वतःला जबरदस्तीने जुंपून घेण्याचा प्रयत्न केला. ( त्यांना अशा स्थितीत त्या सुमारास कवी जसीमुद्दीन यांनी एकदा पाहिले होते ).

दुःखाबरोबर पुष्कळदा एकप्रकारचे नवे गांभीर्य व सखोलता ही येत असतात. तशी ती नजरुल यांच्या स्वभावात व कामातही आली. आपल्या मालकांच्या आदेशांप्रमाणे नजरुल यांनी पूर्वीप्रमाणेच विविध विषयांवरील गीते रचण्यात स्वतःला गुंतवून घेतले. परंतु आता तथाकथित भक्तिगीते ही पूर्वीसारखी नुसती शब्दांची कसरत राहिली नव्हती. ती किती भावपूर्ण बनली होती ते पाहावयाचे असेल तर ' चलो मन अनंत धाम ' ( भजन ) ' आमि कि सुखे गो गृहे रबो ' ( कीर्तन ) यासारखी भजने, कीर्तने, श्यामासंगीत व इस्लामी गाणी नजरेखालून घालावीत. या गीतांच्या विषयांपैकी काही विषय, निदान सांप्रदायिक दृष्टिकोणातून पाहाता, बाह्यतः परस्परविरोधी आहेत. कारण, इस्लामचा दृष्टिकोन कट्टर मूर्ति-पूजाविरोधक आणि एकेश्वरवादी आहे. तर नजरुल यांच्या हिंदू गीतांमध्ये कालीमातेचे ( किंवा प्रकृतिमातेचे ) अथवा एक प्रेमिक, मित्र किंवा पुत्र या नात्याने श्रीकृष्णाच्या प्रेमाच्या विविध रूपांचे मोठ्या भक्तिभावाने वर्णन करण्यात आले आहे.

कोणत्याही सांप्रदायिक पंथाशी स्वतःला निगडित न करणे हे नजरुल यांना सोपे होते. लयबद्ध कथाकार या नात्याने त्यांची हिंदू गीते काहीशी

परंपरागत सामान्य परिपाटीचे अनुकरण करतात. परंतु त्यांच्या बाबतीतील विशेष मजेदार गोष्ट ही की एक मुस्लिम या नात्याने त्यांना इस्लामी पठडीचीही चांगली जाण आहे. मुसलमानांमधील कर्मठ परंतु धर्मवेडे नसलेल्या अनुयायांशी (धर्मवेड्या मुसलमानांना संगीताचा काही उपयोगच नव्हता !) एकरूप बनण्याची अद्‌भुत क्षमता त्यांनी दाखविली. त्यांच्या ' झुलफिकार ' (१९३२) या गीतसंग्रहात अशा प्रकारची अनेक गीते आहेत. त्यांतून सर्व मुसलमानांची आशा व अभिमान व्यक्त झाली आहेत. उदाहरणार्थ,

दिके दिके पुनः ज्वालिया उठिछे दीन इस्लामी लाल मशाल,
(दिशा-दिशांना इस्लामची लाल मशाल पुनः प्रज्वलित होत आहे).

या ठिकाणी ज्या मशालीचा उल्लेख करण्यात आला आहे ती संकुचित धर्मांधतेची अथवा अखिल इस्लामवादाची (पॅनइस्लामची) नसून नजरुल त्यांच्या कल्पनेप्रमाणे कमाल पाशा, झगलुल पाशा, रजा शाह पहलवी इत्यादींच्या द्वारे पुनरुज्जीवित इस्लामची आहे. अशा प्रकारची अनेक गीते व काव्ये इस्लामी दृष्टिकोणातून निर्विवाद व निर्दोष आहेत. एवढेच नव्हे तर ती सर्वांना समानपणे ग्राह्य होण्यासारखी व आध्यात्मिक स्वरूपाचीही आहेत.

बुलबुलच्या मृत्यूनंतरच्या दुसऱ्या टप्प्यात कालीमाता अथवा केव्हा-केव्हा सहजिया* ' देहतत्त्व ' अथवा इतर काही गूढ विषय यांना त्यावेळी नजरुल लिहीत असलेल्या गीतांमध्ये प्राधान्य मिळाले. प्रत्यक्ष जीवनातही यावेळा नजरुल गुह्यविद्येमध्ये ( Occultism ) अधिकाधिक गुरफटले जात होते. (ही गुह्यविद्या साक्षात्कारवाद किंवा गूढवाद ( Mysticism ) यापासून वेगळी आहे). त्याचप्रमाणे हिंदू अथवा इस्लाम या थोर धर्मांकडून ज्यांना सामान्यतः मान्यता दिली जात नाही अशा उपासनामार्गांच्या व क्रियांच्याही ते भजनी लागले होते. परंतु त्यानंतर पुनः याच टप्प्यात ते इस्लामकडे वळल्याचेही दिसून येते. एवढेच नव्हे तर आपल्या पापाचा कबुलीजबाब व पश्चात्ताप यांचेही दर्शन त्यांच्या काव्यात घडले. (नजरुल यांनी आपल्या पाखंडीपणाबद्दल त्यातून पश्चात्ताप व्यक्त केला होता, असाही त्याचा संकुचित अर्थ लावता येईल). हिंदू श्यामासंगीत व मुस्लिम भक्तिगीते हे दोन्ही प्रकारचे भक्ति-विषय शेवटपर्यंत जोडीने चालत राहिले. त्यावरून असे दिसते की या दोन्ही भक्तिमार्गांचा आनंदाने स्वीकार करणे हे मूलतः समान आध्यात्मिक मूल्याचे असते. नजरुल हे प्रत्यक्ष जीवनात व अंतःकरणाच्या गाभाऱ्यात जितके इस्लामनिष्ठ–निष्ठावान् एकेश्वरवादी–होते तितकेच कालीभक्तही होते. सत्य हे एक आहे आणि ईश्वराकडे पोहोचण्याचे सगुण, निर्गुण यांसारखे अनेक मार्ग व इतर उपासनाविधी देवानेच निर्माण केले आहेत, अशी सखोल जाणीव नजरुल यांच्यामध्ये सदैव वसत होती.

* ईश्वराच्या सहजस्वरूपाचे ध्यान करणारा पंथ – अनुवादक

त्यांच्या मेंदूतील भावी बिघाडाची अस्पष्ट लक्षणे त्यांच्या नंतरच्या रचनांमध्येही सापडू शकतात. त्यांचा आपल्या बुद्धीवरील ताबा लौकरच नाहीसा होणार होता; आणि शरीराची जी झीज हळूहळू होत होती तिचा थोडाफार परिणाम त्यांच्या सर्जनशीलतेवरही होत असल्याचे दिसू लागले होते. १९३६ पासून १९४२ पर्यंतच्या काळातील त्यांच्या लिखाणाचे यथोचित रसग्रहण करणाऱ्याने त्या काळातील नजरुल यांचे दुःखपूर्ण जीवनही लक्षात घेतले पाहिजे.

बुलबुलच्या मृत्यूबरोबर नजरुल यांचा वरवरचा निरीश्वरवाद नाहीसा झाला. तसे पाहिल्यास ते खरेखुरे किंवा पक्के निरीश्वरवादी कधीच नव्हते. कारण त्यांच्या सखोल उद्‌गारांमध्ये ईश्वरी चैतन्यावर त्यांची श्रद्धा नसल्याचे आपल्याला केव्हाही आढळत नाही. तरीपण सुमारे १९२०–२१ पासून त्यांनी जाणीवपूर्वक व गंभीरपणे कोणत्याही धार्मिक पंथावर आपली श्रद्धा नसल्याचे जाहीर केले होते. त्यांच्या स्वभावानुसार आपला हा विरोध त्यांनी वाजवीपेक्षा अधिक उच्च स्वरात जाहीर केला होता; आणि आपण निरीश्वरवादी व साम्यवादी असल्याचे त्यांनी पुष्कळदा निष्कारणच कठोर शब्दांत व्यक्त केले होते. जगाकडून होणारा अन्याय आणि ईश्वर, जात अथवा धर्म यांच्या नावाने माणसाचे माणसाकडून होणारे शोषण यांमुळे ते धर्माविरुद्ध बंड करून उठले. या गोष्टींमुळेच कोणत्याही ईश्वरी शक्तीने हे जग निर्माण केलेले नाही आणि मानवी नियतीचे मार्गदर्शन केलेले नाही, आणि म्हणून मानवाने आपली नियती आपण स्वतःच ठरविली पाहिजे अशी त्यांची खात्री पटली होती. शेलेप्रमाणे नजरुल यांचा हा निरीश्वरवाद तथाकथित औपचारिक धर्मश्रद्धांपेक्षा एका अधिक सखोल श्रद्धेवर आधारलेला होता. परंतु मार्क्सवादाच्या कसोटीवर घासून पाहिल्यास नजरुल यांचा ' निरीश्वरवाद ' अगदीच वरवरचा होता, असे म्हणावे लागते. या वस्तुस्थितीची इतरांप्रमाणेच त्यांना स्वतालाही चांगली जाणीव होती.

भारतातील सर्वसामान्य बालक, जवळ-जवळ आपल्या मातेच्या दुधातूनच देवावरील व अलौकिकावरील थोडीफार श्रद्धा वारसा म्हणून घेऊन येत असते. या सामान्य नियमाला नजरुलही अपवाद नव्हते. त्यांना परंपरेतून मुस्लिम धर्मश्रद्धा व इस्लामी पाठशाळेचे शिक्षण मिळाले होते. त्याचप्रमाणे प्रारंभिक काळात तांत्रिक कल्पना व क्रिया, हठयोग इत्यादींवर आणि फकीर व साधू-संन्यासी वगैरेंच्या चमत्कार-शक्तीवरही त्यांची श्रद्धा बसली होती. त्यांच्या मनाची एकूण जडण-घडण लक्षात घेता ते धर्मवेडे किंवा धर्मांध बनणे शक्यच नव्हते. तरी पण कोणत्याही धर्माच्या साधु पुरुषांच्या मार्गदर्शनाने, श्रद्धायुक्त अंतःकरणाने विशिष्ट क्रिया केल्यास माणसाला अलौकिक सिद्धी प्राप्त होऊ शकतात अशी त्यांची श्रद्धा होती. सुरुवातीलाच वारसा म्हणून मिळालेल्या अशा गोष्टी कालांतराने लाभलेल्या कल्पना व सवयी यामुळे अनेक वर्षांच्या अवधीत दडपल्या जाण्याची शक्यता असते. परंतु त्या समूळ नाहीशा

होत नाहीत. अशा गोष्टी सामान्य स्त्री-पुरुषांच्या प्रत्यक्ष जीवनातील अनेक कृत्यांवर जाणीवपूर्वक अथवा अजाणता निर्णायक परिणाम घडवू शकतात, हे आधुनिक मानसशास्त्राने मान्य केले आहे. तथापि, हेही तितकेच खरे आहे की, माणूस जसजसा परिपक्व होत जातो, तसतशा या कल्पना व विशिष्ट लक्षणांच्या सवयी यांमध्ये निदान काही मर्यादेपर्यंत तरी फेरबदल घडून येतात. विशेषतः व्यक्तीची युक्तिवादाची क्षमता जेव्हा विकसित होते, अनुभव वाढतो व वैज्ञानिक शिक्षण प्राप्त होते तेव्हा या कल्पनांना व प्रवृत्तींना वेगळे वळण लागते. नजरुल जेव्हा प्रौढ बनले, त्यांच्या स्वतःच्या प्रज्ञेने व अनुभवांनी, तसेच त्यांच्या मानवतावादाने व स्वातंत्र्य-प्रेमाने त्यांच्या मनात जुन्या श्रद्धा व समजुती याविषयी संदेह निर्माण केला तेव्हा तेही या अवस्थेला पोचले असले पाहिजेत. त्यांच्या या जागृतीत सोव्हिएत क्रांतीचाही हात असला पाहिजे. आत्मनिरीक्षणाची वृत्ती असलेल्या व्यक्तीच्या बाबतीत ईश्वरवादाकडून निरीश्वरवादाकडे, प्रारंभीच्या आत्मसंतुष्ट 'आस्तिकते'तून शोध घेणाऱ्या 'नास्तिकते'कडे जाण्याची ही प्रक्रिया अत्यंत व्यथित करणारी असते. परंतु नजरुल हे प्रामुख्याने बहिर्मुख वृत्तीचे असल्याने त्यांना अशा प्रकारची कसलीही व्यथा अनुभवावी लागली नाही. परंतु त्यांनाही विशिष्ट मानसिक द्वंद्वातून बाहेर पडावेच लागले. धर्मातील 'गां'बद्दल ईश्वरवादा'विषयी त्यांच्या मनात संदेह निर्माण झाला. परंतु त्याचबरोबर त्यांच्या अंतःकरणाचे जे भाव काव्यातून व इतर मार्गांनी व्यक्त झाले त्यांमध्ये ईश्वरी वरदानावर त्यांनी त्यापेक्षाही अधिक जोर दिला. ( 'राजबंदीर जबानबंदी' यांसारख्या कृतींमध्ये त्यांचा हा भर दिसून येतो). शिवाय, त्यांच्यासारख्या भावनाप्रधान स्वभावाच्या कोणाही व्यक्तीला रूक्ष भौतिकवादाशी, किंबहुना पदार्थवादी निरीश्वरवादाशी अथवा वस्तुनिष्ठ मानवतावाद किंवा प्रत्यक्षवाद यांच्याशी जुळवून घेणे अवघड जाते. १९२१ पासून १९३० पर्यंतच्या काळात नजरुलच्या अंतःकरणामध्ये श्रद्धा कायमची दबा धरून बसलेली होती. बाह्यतः निधार्मिकपणाच्या कालखंडात देखील श्री अरविंदांचे बंधू बारींद्रकुमार घोष आणि आर्य प्रकाशन गृहाची मंडळी (हे त्यांचे पहिले प्रकाशक होते) यांच्याशी त्यांचे जे घनिष्ठ संबंध होते ते केवळ प्रासंगिक अथवा केवळ राजकीय विचार प्रणालीमुळे जुळून आलेले नव्हते. श्री अरविंदाकडून पुरस्कारिले गेलेले तांत्रिक योगाचे तत्त्वज्ञान या मित्रांनी आत्मसात केले होते; आणि गूढविद्या व गुह्यज्ञान यांचा ते उघडउघड प्रचार करीत होते. त्यांनी बहुधा जाणून-बुजून नजरुल यांच्या तंत्रमार्गावरील, काली-पंथावरील, आणि योगी, सिद्ध, फकीर इत्यादींच्या ठिकाणी असलेल्या चमत्कार सामर्थ्यावरील जुन्या श्रद्धेला खतपाणी घातले असावे.

१९३० साली झालेल्या बुलबुलच्या मृत्यूमुळे नजरुल यांच्यासमोर जीवन-मरणाचे गूढ, आत्मा आणि मरणोत्तर जीवनाची समस्या, एवढेच नव्हे तर

आपल्या स्वतःसंबंधीचे प्रश्नचिन्ह ठळकपणे उभे राहिले. तांत्रिक क्रियांच्या द्वारे जिवंत व मृत व्यक्तींमध्ये, आपला बुलबुल व आपण स्वतः यांमध्ये, त्या दोघांना जोडणारा एक पूल निर्माण करता येतो, या आपल्या जुन्या समजुतीला नजरुल यांनी मोठ्या उत्सुकतेने कवटाळले. अशा परिस्थितीत नजरुल यांच्या जागी दुसरा कोणी अंतर्मुख वृत्तीचा मनुष्य असता तर तो गूढवादी किंवा साक्षात्कार-वादी मार्गाने गेला असता, शुद्ध अध्यात्मवादी ध्यानधारणेचे अनुसरण त्याने केले असते, कबीर दादू इत्यादी मध्ययुगीन संत व सूफी यांच्या उपदेशाप्रमाणे त्याने भक्तिमार्गाचे आचरण केले असते. परंतु नजरुल यांच्यासारखा बहिर्मुख वृत्तीचा, तीव्र भावनांचा व तंत्रमार्गावर श्रद्धा असणारा माणूस हा चमत्कार व मरणोत्तर जीवनाचा प्रत्यक्ष पुरावा पाहावयास मिळाल्याखेरीज समाधान मानणार नाही; आणि त्यापायी तो तंत्रमार्ग व हठयोग यांच्या पंथांच्या व क्रियांच्या अवघड वाटेने जाण्याची धडपड करणार, हे उघडच होते. नजरुल हे हठयोगाच्या या गुह्यमार्गाकडे जेवढे आकर्षित झाले होते तेवढी 'आधात्मिक शोध' घेण्याची ओढ त्यांना लागलेली नव्हती. मृताशी संवाद साधण्याच्या कामी ज्यांची मदत होऊ शकेल असे तांत्रिक सिद्ध व फकीर भेटावेत यासाठी ते अत्यंत उत्सुकतेने धडपडत होते. याचा जो परिणाम व्हावयाचा तोच झाला. बुलबुल याच्याशी शारीरिक व आध्यात्मिक संपर्क प्रस्थापित करण्याच्या भावनात्मक आर्ततेने व वेडे करून टाकणाऱ्या शोकातिरेकाने नजरुल हे विवेकशून्यतेच्या अधिकाधिक आहारी जात गेले. बारींद्रकुमार घोषांनी (की कलावंत मित्र नलिनीकांत सरकारांनी ?) नजरुलना असे सांगितले होते की त्यावेळचे लालगोला हायस्कूलचे मुख्याध्यापक कै. बरदाचरण मजुमदार यांनी श्री अरविंदांइतकीच आध्यात्मिक शक्ती व क्षमता प्राप्त केलेली होती; आणि श्री मजुमदार यांच्या मदतीने–आणि अर्थातच श्री मजुमदार यांच्या मार्गदर्शनाखाली स्वतः योगक्रियांचे प्रशिक्षण मिळवून त्यांच्याद्वारे – बुलबुलची प्रत्यक्ष भेट घेणे नजरुल यांना नक्कीच शक्य होते. हे ऐकताच नजरुल धावतच लालगोला येथे गेले; श्री मजुमदारांकडून त्यांनी दीक्षा घेतली; आणि त्यांच्या मार्गदर्शनाने योगक्रिया करण्यास सुरुवात केली. काही काळपर्यंत त्यांनी भगवी वस्त्रेही परिधान केली. त्या सर्वांतून त्यांना काय प्राप्त झाले अथवा त्यामध्ये त्यांची किती प्रगती झाली याचा निर्णय सामान्य जनांना करिता येणार नाही. या संदर्भात नमूद करण्यासारखी महत्त्वाची गोष्ट एवढीच की अशा मनःस्थितीतही, निदान काही वर्षेपर्यंत तरी नजरुल हे उच्च दर्जाचे सर्जनात्मक लिखाण करू शकत होते.

नंतर आला आजार. त्याने गुपचुपपणे सरपटत येऊन त्यांच्या शरीरावर हल्ला चढविला. प्रारंभिक अवस्थेत त्याच्यावर औषधोपचार करण्यात आले नाहीत, किंवा त्याच्याकडे कोणी गंभीरपणे लक्षही दिले नाही. प्रथम असे वाटले

की योगक्रियांचा किंवा योगासनांचा तो परिणाम असावा. वस्तुतः त्यावर तातडतोब औषधोपचार व्हावयास हवा होता. परंतु त्याच्याकडे दुर्लक्षच होत राहिले. अखेर मेंदूच्या विकृतीची लक्षणे गंभीर स्वरूपात दिसू लागली. कोणतेही नियमित काम करण्याची क्षमता नजरुल यांच्यामध्ये उरली नाही.

नजरुलवरील दुसरा भयंकर आघात त्यानंतर व्हावयाचा होता. १९३९ साली त्यांच्या पत्नी प्रमिलादेवी यांच्या आजाराच्या रूपाने तो आला. त्या अंथरुणाला खिळल्या, आणि लौकरच असे आढळून आले की त्यांच्या शरीराचा खालचा अर्धा भाग अर्धांगाने लुळा पडला आहे. तशा त्या पूर्ण गृहिणीवर होत्या; आणि त्या अवस्थेतही त्या घरचे कामकाज थोड्याफार प्रमाणात पाहू शकत होत्या. नजरुल स्वतःच आजारी असताना पत्नीचा हा आजार आल्यामुळे त्यांना तो धक्का सहन झाला नाही. ते मानसिकदृष्ट्या अधिकाधिक खिळखिळे होत गेले. प्रमिलादेवींचे सततचे आजारपण हे चिंतेचे आणखी एक कारण बनले. त्या दोघांवरही व सातत्याने औषधोपचार होण्याची आवश्यकता होती. या साऱ्यासाठी कुटुंबाला वाढता खर्च करावा लागणार होता.

अशा प्रकारे या सर्व दुर्दैवी घटना घडत असताना नजरुल यांची सांपत्तिक स्थिती फारच खालावली असल्याचे अधिकाधिक स्पष्ट होऊ लागले. नजरुल यांच्या शारीरिक आजाराने त्यांच्या कामात अडथळा निर्माण होण्यासारखी परिस्थिती निर्माण होईपर्यंत पूर्वीच्या काही वर्षांमध्ये त्या काळच्या इतर कलावंतांशी तुलना करिता त्यांनी भरपूर पैसा कमावला होता, यात शंका नाही. परंतु आपण पूर्वी पाहिल्याप्रमाणे व्यवहारकौशल्य किंवा दूरदर्शीपणा त्यांच्या रक्तात नव्हता. त्यांचा उदारपणा हा दुर्गुण ठरावा इतका अमर्याद होता; आणि मित्रमंडळींसमवेत मौजमजा करण्यात त्यांनी पाण्यासारखा पैसा उधळला. कदाचित बुलबुलच्या निधनाने झालेले दुःख विसरण्यासाठी ते मित्रांच्या संगतीत जास्त काळ घालवीत असतील. त्यांच्या खर्चिकपणावर नियंत्रण ठेवणे त्यांच्या पत्नीलाही शक्य झाले नाही; अथवा त्यांच्या सासूबाई गिरिबाला देवी यांनाही ते जमले नाही. त्या दोघींपैकी गिरिबाला देवी या अधिक अनुभवी असल्याने संसार चालविण्याची जबाबदारी त्यांनी आपल्यावर घेतली होती. पण त्यांचेही काही चालले नाही. नजरुलना शहाणपण सुचण्याची तर शक्यताच नव्हती. कारण त्यांना असे वाटत होते की, आपली सर्जनक्षमता व आर्थिक सुस्थिती यांचा शेवट कधीच होणार नाही. अखेर आपल्या विपन्नावस्थेत १९३९ साली त्यांना एच्. एम्. व्ही. च्या ध्वनिमुद्रिकांपासून मिळणारी रॉयल्टी आणि १९३७ पासूनच्या इतर साहित्यिक रचना सॉलिसिटर असीम कृष्ण दत्त यांच्याकडे एकूण चार हजार रुपयांना गहाण टाकणे भाग पडले. भरपूर पैसा मिळवून देणाऱ्या व अत्युत्कृष्ट असणाऱ्या कलाकृती केवळ चार हजार रुपयांना गहाण पडाव्यात, ही शोकांतिकाच स्वतः सर्व काही

सांगून जाते. तथापि, त्यापूर्वी नजरुल यांनी केलेल्या असल्याच इतर व्यवहारां-प्रमाणे हा व्यवहारही क्लेशदायकच ठरला. त्यांना आपल्या कलाकृती गहाणातून कधीच सोडविता आल्या नाहीत. गहाण ठेवणारे वकील साहेब हे कलकत्त्यातील सामाजिक व राजकीय उच्चभ्रू समाजात अत्यंत मान असलेले प्रतिष्ठित गृहस्थ आहेत. त्यांनी ती रक्कम तावडतोब दिली. नजरुलनी लहान-सहान देणेकऱ्यांच्या रकमा देऊन टाकल्या. त्यामुळे त्या पैशाचा दीर्घकालीन उपयोग होऊ शकला नाही. उरलेली रक्कम कुटुंबाच्या गरजा भागविण्यास पुरेशी नव्हती. त्यांमध्ये सर्वात मोठी बाब कित्येक दिवसांपासून न दिलेली औषधोपचाराची बिलेही होती. शिवाय, नजरुल जसजसे अपंग बनत गेले तसतशी त्यांच्या पत्नीला प्रशिक्षित परिचारिकेची गरज भासू लागली. महागाई वाढली होती व गरजेच्या वस्तू दुर्मिळ होऊ लागल्या होत्या; कारण एव्हाना दुसरे महायुद्ध सुरू झाले होते.

आता पक्ष्याचे पंख तुटले होते. तात्कालिक गरजा भागविण्यासाठी अधून-मधून प्रयत्न चालूच होते. कवीला कायमची नोकरीही नव्हती अथवा त्याच्या कामात स्थैर्य वा सातत्यही नव्हते. परंतु गरजा मात्र वाढतच होत्या. आपल्यामध्ये असलेले जेवढे काही सामर्थ्य एकत्रित करणे शक्य होते तेवढे करण्याचा त्यांनी प्रयत्न केला. याच सुमारास मुस्लिम लीग आणि काँग्रेस यांच्यांतील संघर्ष चांगलाच तीव्र झाला होता; आणि ए. के. फझलुल हक यांच्या, पुनः काही काळासाठी सुरू करण्यात आलेल्या, दैनिकातून 'द्विराष्ट्र'–सिद्धांता-विरुद्ध लढा देण्यास नजरुल खुशीने तयार झाले. त्या पत्रातील त्यांचे लिखाण वैशिष्ट्यपूर्ण होते. त्यामध्ये भरपूर भावुकता व सखोल आदर्शवाद होता. परंतु त्यात समतोल नव्हता; आणि त्या काळाची गरज लक्षात घेता ते फारसे टोकदार अथवा मुद्देसूदही नव्हते. त्या काळातील त्यांच्या लिखाणापैकी 'शक्ति-स्तुति' अथवा रवींद्रनाथांवरील मृत्युलेख यांसारख्या काही रचना नक्कीच उच्च कोटीच्या होत्या. बहुधा प्रत्येक लिखाणातून राष्ट्रीय स्वातंत्र्य व मानवता यांविषयी त्यांना वाटणारी तीव्र चिंता व्यक्त होत होती. यांपैकी काही लेख एकत्र करून 'नतुन चाँद' (नवीन चंद्र) या शीर्षकाने त्यांचा संग्रह कालांतराने (१९४५) प्रसिद्ध करण्यात आला. नजरुल यांची स्थिती फारशी उत्साहदायक नव्हती. त्यांचे काही मित्र सहानुभूतीने व निष्ठेने त्यांना चिकटून राहिले. त्यांमध्ये कै. कालिपद गुह राय (हे नंतर बनारसला स्थायिक झाले; आणि भारतातील श्रेष्ठ योग्यांपैकी एक अशी त्यांची कीर्ती पसरली), एक उत्तम व विचारवंत लेखक कै. अमलेंदु दासगुप्त, आणखी एक चांगले निबंधकार कै. नृपेंद्रकृष्ण चट्टोपाध्याय, झुलफिकार अहमद (हे सध्या बांगला देशात असून सूफी झुलफिकार अहमद या नावाने प्रसिद्ध आहेत), आणि इतर काही हिंदू व मुस्लिम मित्र यांचा समावेश होतो. हे मित्र नजरुल कुटुंबाच्या चिंतेत सहभागी झाले; आणि त्या चिंतेचे ओझे कमी

करण्यात आपल्याकडून होईल तेवढा हातभार त्यांनी लावला. परंतु ते सगळे आध्यात्मिक वृत्तीचे लोक होते. आपापल्या—हिंदू किंवा मुस्लिम—धर्मश्रद्धांनुसार त्यांचा अदृष्टावर अथवा गूढ शक्तींवर सारा भर असे; आणि शास्त्रीय औषधोपचार त्यांना गौण वाटत. स्वतः नजरुलही संशयास्पद योगीक्रियांमध्ये जास्त-जास्त गुरफटत गेले. त्यांच्या साह्याने ते कोणत्याच निश्चित मुक्कामाला पोचू शकले नाहीत; परंतु तरीही त्यांनी धीर सोडला नाही.

जी मोठी शोकांतिका येऊ घातली होती तिच्या खाणाखुणाही आपल्याला या काळात सापडू शकतात. १९४१ साली बोनगांव ( २४ परगणा ) येथील साहित्य सम्मेलनाचे नजरुल अध्यक्ष होते. त्यावेळी नुसत्या शाब्दिक कोट्यांवर भर देऊन त्यांनी निरर्थक व कंटाळवाणे भाषण केल्याचे दिसून येते. ( 'मिष्ट' आणि 'मिस्टिसिझम' ) "मिस्टिसिझम ( गूढवाद ) मध्ये मी 'मिष्टि' ( गोडवा, मिठाई ) शोधून काढली आहे. त्यातून मला अमृत मिळाले आहे. त्यामुळे माझे भाषण माधुर्याने तुडुंब भरले आहे—मधुरम्, मधुरम्, मधुरम्!" त्यांनी असा खुलासा केला की, "मी स्वतःला, आणि या 'स्व'शी संबंधित असणाऱ्या माझ्या गोष्टी ( सर्वस्व ) त्याच्या ( परमेश्वराच्या ) चरणी अर्पण करून सर्व जंजाळा-तून मुक्त होत आहे." त्यांच्या या भाषणाची भाषा सुंदर होती. परंतु त्यातून काहीतरी वेगळेच ध्वनित होत होते. पुढील महिन्यात, म्हणजे १९४१ च्या एप्रिलमध्ये मुस्लिम समिती सम्मेलन प्रसंगी ते याच सुरात बोलत असल्याचे आपल्याला आढळते. ते म्हणतात, "माझी बासरी यापुढे वाजण्याची बंद झाली—या ठिकाणी मी कवी म्हणून बोलत नसून तुमच्याकडून प्रेम प्राप्त झालेली एक व्यक्ती या हक्काच्या नात्याने बोलत आहे—तर तुम्ही मला क्षमा करा आणि कृपा करून मला विसरून जा. माझ्यावर विश्वास ठेवा, कवीची भूमिका वठ-विण्यासाठी अथवा पुढारी बनण्यासाठीही माझा जन्म झालेला नाही. मी माझे प्रेम वाटण्यासाठी जन्माला आलो होतो. मी प्रेमाचीच आकांक्षा बाळगली; परंतु मला ते प्रेम मिळाले नाही. मी मूक निराशा उराशी बाळगून या रुक्ष व प्रेमहीन जगाचा निरोप घेतो."

परंतु या वेळेपर्यंतही त्यांचे मानसिक आरोग्य पूर्णपणे नष्ट झालेले नव्हते. टागोरांच्या निधनानंतर त्यांना श्रद्धांजली वाहणारी एक शोककविता त्यांनी एकदा लिहिली होती ( १९४१). दुसऱ्या एका प्रसंगी, चँग कै शेक यांनी भारताला १९४२ च्या फेब्रुवारीत भेट दिली असता ( काँग्रेसच्या पुढाकाराने चीन व भारत यांच्यात संगनमत घडवून आणण्याचे प्रयत्न चालले असल्याची वदंता त्यावेळी ऐकू येत होती) नजरुल यांनी एक कविता लिहून चिनी नेत्याच्या भारत-भेटीचे स्वागत केले होते. ती कविता तशी फारशी चमकदार नव्हती; तरीपण ती बऱ्यापैकी नक्कीच होती.

एका रात्री शामबाजार येथील आपल्या घरातून नजरुल अचानक नाहीसे झाले. दुसऱ्या दिवशी संध्याकाळी त्यांचा शोध लागला. दक्षिणेश्वरच्या काली मंदिराच्या आसपास (या मंदिरामध्ये श्री रामकृष्ण परमहंसांचे वास्तव्य होते) हमरस्त्याच्या कडेने ते चालले होते. त्या रस्त्यावरून लष्करी ट्रक वेगाने धावत होते; आणि कोणत्याही क्षणी नजरुल त्या ट्रकाखाली सापडून चिरडले गेले असते. पण त्यांना त्याची जणू गंधवार्ताही नव्हती.

अखेर ९ जुलै १९४२ रोजी तो दुर्दैवी क्षण आला. त्या दिवशी रात्री आकाशवाणीच्या कलकत्ता केंद्रावरून नजरुल आपले एक भाषण प्रसारित करीत होते. भाषणाला सुरुवात झाली होती. परंतु अचानक त्यांची वाचा बसली. तेथून त्यांना घरी आणीपर्यंत त्यांच्या सर्वच मानसिक क्षमता नष्ट होऊ लागल्या होत्या. ग्रहणाला सुरुवात झाली; आणि ते खग्रास व कायमचे असल्याचे दिसू लागले. (अगदी अलीकडे, दोन वर्षांपूर्वी, १९७० साली, 'मी ढाक्याला जाणार' व 'मी गांधीजींना भेटणार' ही दोन असंबद्ध वाक्ये त्यांनी उच्चारली होती, असे सांगतात.)

अशा प्रकारे एकदम मानसिक शक्तिपात झाल्यानंतर १९४२ साली लौकरच वैद्यकीय मदत मिळविण्याचा प्रयत्न करण्यात आला; आणि कै. डॉ. बिधानचंद्र राय यांनी तत्परतेने ती मदत दिली. परंतु तिचा काही उपयोग झाला नाही. नंतर नजरुल यांना मनोरुग्णांसाठी असलेल्या लुंबिनी पार्क इस्पितळात दाखल करण्यात आले. तेथे कै. डॉ. जी. एस्. बोस यांनी त्यांच्यावर उपचार केले. त्यांचाही काही उपयोग झाला नाही. डॉ. बोस यांनी असे सांगितले की, "या आजाराची पाळेमुळे शारीरिक असून ती फार खोलवर गेलेली आहेत." महायुद्धाचे दिवस असल्याने त्यांना उपचारासाठी परदेशात नेण्याची शक्यताच नव्हती. उपचारांच्या बाबतीत एखाद्या विशिष्ट दिशेने निश्चित असे काही करिता आले नाही. सहानुभूती भरपूर होती; आणि कवीला व त्याच्या आपद्ग्रस्त कुटुंबाला मदत करण्याचे कळकळीचे प्रयत्नही करण्यात आले. विपद्ग्रस्त कवीसाठी कै. डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी यांच्या अध्यक्षतेखाली एक सहाय्य समितीही काही काळ काम करीत होती. कवीच्या प्रकाशित साहित्याचे व ध्वनिमुद्रित संगीताचे जे हक्क विकले गेले होते अथवा गहाण पडले होते ते कवीला परत मिळवून देण्यात या समितीला यश आले नाही. हळूहळू या समितीचा उत्साह ओसरला व अखेर ती निष्क्रिय बनली. दरम्यानच्या काळात नजरुल यांची तब्येत दिवसेदिवस बिघडतच चालली होती. अखेर १९४६ साली महायुद्ध संपल्यानंतर नजरुल यांच्या सासूबाई अकस्मात् घरातून नाहीशा झाल्या. वस्तुतः आतापर्यंत त्यांनीच या कुटुंबाचा सारा असह्य भार वाहिला होता. मानसिक चिंतांखेरीज त्यांना कामाचा रगाडाही उपसावा लागत होता. दोन रोग्यांची सेवा-शुश्रूषा त्यांना करावी लागत होती. त्यांपैकी एक

अंथरुणाला खिळलेला तर दुसरा शारीरिक व मानसिकदृष्ट्याही रुग्ण होता. एकूण परिस्थितीच्या दडपणामुळे परमेश्वराजवळ आसरा शोधण्याचा हा शेवटचा मार्ग त्यांना अवलंबावा लागला असण्याची शक्यता आहे. त्यांचा पुनः काही तपास लागला नाही. अशा या संपूर्ण असहाय्य परिस्थितीत पश्चिम बंगालच्या सरकारने (यावेळी नुकतेच स्वातंत्र्य मिळाले होते) कवीला निवृत्तिवेतन म्हणून दरमहा २०० रुपये द्यावेत, यासाठी त्याचे मन वळविण्यात आले. प्रमिलादेवी अंथरुणात पडल्या-पडल्या तेवढ्या रकमेत कसाबसा संसार चालवीत होत्या. त्यावेळी त्या कुटुंबात पतिपत्नीखेरीज त्यांचे दोन वाढत्या वयाचे मुलगेही होते. त्या हे काम ३० जून १९६२ रोजी त्यांचे निधन होईपर्यंत अखंडपणे करीत राहिल्या. या थोर स्त्रीने शेवटपर्यंत दुर्दैवाशी लढा दिला; आणि स्वतः सतत २३ वर्षे रोगग्रस्त असूनही आपल्या पतीची सेवाशुश्रूषा केली. आधुनिक बंगाली साहित्याच्या इतिहासात तिला फार मोठे व विशेष स्थान देण्यात आले पाहिजे.

तथापि प्रमिलादेवींच्या मृत्यूपूर्वी सुमारे १० वर्षे, १९५२ साली एक औषधोपचार सहाय्य समिती स्थापन करण्यात आली होती; आणि नजरुलच्या मित्रांनी त्यांच्यावर परदेशात तज्ज्ञांकडून उपचार करविण्यासाठी निधी गोळा केला होता. १९५२ च्या मे महिन्यात नजरुल व प्रमिलादेवी यांना घेऊन काही मंडळी युरोपला गेली; आणि त्यांनी लंडन व व्हिएन्ना येथील विशेषज्ञांना त्यांची तब्येत दाखविली. काही सोव्हिएट तज्ज्ञांचाही सल्ला घेण्यात आला. सामान्यतः सर्वांचे असे मत पडले की आता फारच उशीर झाला असून काहीच करिता येण्यासारखे नाही. त्यामुळे त्या मंडळींना युरोपला गेल्यानंतर काही महिन्यांतच कलकत्त्याला परत येणे भाग पडले. आता नजरुल यांच्या प्रकृतिस्वास्थ्याच्या बाबतीतील आशेचा शेवटचा किरणही मावळला.

१९६२ साली नजरुल यांच्या पत्नीचे निधन झाले. तेव्हापासून नजरुल यांच्या बाबतीत फारसे काही घडलेले नाही. नजरुल यांचे दोन मुलगे आता मोठे झाले असून त्यांची लग्ने झाली आहेत; व त्यांना मुलेही झाली आहेत. काजी सव्यसाची या आपल्या थोरल्या मुलाबरोबर सी. आय. टी. फ्लॅट (कलकत्ता १४) येथे नजरुल राहातात. हा मुलगा आपल्या वडिलांच्या कविता उत्तम प्रकारे गातो, अशी त्याची ख्याती आहे. धाकटा मुलगा काजी अनिरुद्ध हा उत्कृष्ट गिटारवादक म्हणून प्रख्यात आहे. बाकी सांगावयाचे म्हणजे कवीविषयीचे लोकांचे प्रेम सतत वाढत राहिले आहे. नजरुल यांचा जन्मदिवस हा एक राष्ट्रीय दिवस समजला जातो आणि तो मोठ्या अभिमानाने व उत्साहाने साजरा केला जातो. पश्चिम बंगाल सरकारने कवीला निःशुल्क औषधोपचार मिळेल अशी व्यवस्था केली आहे. त्याखेरीज त्यांचे २०० रुपयांचे निवृत्तिवेतन वाढवून ते ३०० रुपये करण्यात आले आहे. पूर्वीच्या पूर्व पाकिस्तान सरकारने नजरुल यांना दरमहा ३५० रुपयांचे

निवृत्तिवेतन सुरू केले होते. ते पूर्व बंगालमध्ये मार्च १९७१ मध्ये क्रांती सुरू झाल्यानंतर अकस्मात् बंद करण्यात आले. परंतु आता बांगलादेशच्या सरकारने ते पुनः चालू केले आहे. भारताच्या राष्ट्रपतींनी नजरुलना 'पद्मभूषण' हे अलंकरण बहाल केले असून कलकत्ता विश्वविद्यालयाने आपले अत्यंत स्पृहणीय जगत्‌तारिणी सुवर्णपदक देऊन त्यांचा गौरव केला आहे. १९६७ व १९६९ च्या पश्चिम बंगालच्या संयुक्त आघाडी सरकारांनी नजरुल यांच्या सन्मानार्थ एक विशाल भवन उभारण्याचा निर्णय घेतला होता. त्यामध्ये कवींच्या निवासाची सोयही असणार होती; आणि शिवाय त्या इमारतीत नजरुल संशोधन संस्थाही राहावी, अशी कल्पना होती. कलकत्ता महानगरपालिकेने १९६९ साली डमडम विमान-तळापासून शहरापर्यंत येणाऱ्या रस्त्याला काजी नजरुल इस्लाम यांचे नाव दिले. परंतु पूर्वीच्या संयुक्त आघाडी सरकारने हाती घेतलेले एक अत्यंत महत्त्वाचे काम मात्र अजून पुढे सरकलेले नाही. बहुधा हितसंबंधी लोकांनी कायदेशीर अडथळे निर्माण केल्यामुळे तसे झाले असावे. हे नियोजित परंतु अद्यापि अमलात न आलेले कार्य म्हणजे नजरुल यांचे संपूर्ण साहित्य माफक किमतीत लोकांना उपलब्ध करून देणे हे होय. त्यामध्ये नजरुल यांच्या प्रत्येक गाण्याचे स्वरलेखन (नोटेशन) ही अंतर्भूत व्हावयाचे आहे. बांगला देश व भारत यांच्या सरकारांनी मैत्रीपूर्ण सहकार्य करावे असे हे एक क्षेत्र आहे. तसेच पूर्व व पश्चिम बंगालच्या लोकांनी त्यांचा समाईक व अभिमानास्पद वारसा असणाऱ्या काजी नजरुल इस्लाम यांच्या संपूर्ण साहित्याचे पुनःसंशोधन, पुनःसंग्रह व पुनःसंपादन करण्याच्या कामी स्नेहपूर्ण स्पर्धा करण्याचेही ते एक क्षेत्र आहे.

## प्रकरण : सातवे

# नजरुल यांचे प्रतिज्ञापत्र

काजी नजरुल इस्लाम यांचे कलाकार या नात्याने जे जीवन होते ते आता संपल्यासारखे दिसत आहे. अर्थात् एखादा चमत्कार घडून ते बरे झाले तरचा प्रश्न निराळा. सुमारे पन्नास वर्षांपूर्वी जेव्हा ते प्रथम पुढे आले तेव्हापासून त्यांच्या प्रतिभेविषयी कधीच कोणाला शंका आली नाही. जनतेचा कवी, राष्ट्रीय स्वातंत्र्य व मानवाचे हक्क यांसाठी लढणारा निर्भय, युगप्रवर्तक योद्धा, आणि त्याचबरोबर विकसित झालेला गीतलेखक इत्यादी विविध भूमिकांतून त्यांनी जे कार्य केले त्याविषयी समर्थ टीकाकार आणि त्यांचे लक्षावधी देशबांधव यांनी आपली कृतज्ञतापूर्वक मान्यता व्यक्त केली आहे. त्यांच्या या विविध स्वरूपातील कार्याची अधिक काळजीपूर्वक छाननी व अध्ययन होणे आवश्यक आहे.

समकालीन बंगाली जीवनात आणि साहित्यात नजरुल यांचे स्थान ' रवींद्र युगातील ' निदान त्याच्या उत्तरार्धातील दुसऱ्या क्रमांकाचा कवी हे असल्याचे अनेकांनी नमूद करून ठेवले आहे. लेखक आणि संगीतकार या दोन्ही दृष्टींनी ते श्रेष्ठ होते. या दोन्ही गुणांचा असा मधुर संगम रवींद्रनाथ टागोरांखेरीज दुसऱ्या कोणत्याही कलावंतामध्ये आढळत नाही. अलीकडील काळात ज्या थोड्याशा बंगाली कवींनी—त्यांच्यावरील टागोरांचे ऋण लक्षात घेऊनही—आपला ठसा उमटविण्यात यश मिळविले ते म्हणजे सत्येंद्रनाथ दत्त, जतींद्रनाथ सेनगुप्त आणि मोहितलाल मजुमदार हे होत. तथापि या किंवा या कालखंडातील इतर कोणाही कवीप्रमाणे नजरुल यांनी कसेही करून टागोरांच्या प्रभावापासून मुक्त होण्याचा प्रयत्न करून आणि उपचारवादी व शैलीविषयक हातचलाखी वापरून आपली मौलिकता सिद्ध करण्याची इच्छा कधीही बाळगली नाही. तसा प्रयत्न न करिताही नजरुल हे सुरुवातीपासूनच टागोर पंथापासून वेगळे ( नॉन-टागोरियन ) राहिले. याचे कारण असे की विचार व शैली यांबाबतीत ते मुळातच वेगळे आहेत. अर्थात असे असणे हे नेहमीच सोयीचे ठरलेले नाही. एक गोष्ट मात्र खरी की ते, बुद्धिवंत ( इंटलेक्चुअल ) नाहीत, आणि आपण बुद्धिवंत असल्याचा आवही

त्यांनी कधी आणला नाही. त्यांच्या मते हृदय हेच सर्वस्व आहे. त्यांच्या काव्याचे मार्गदर्शक व कसोटी हे हृदयच आहे. जाज्वल्यमान भावना, साधेपणाची मोहकता असलेली मनःपूर्वकता आणि जवळ-जवळ अमर्याद असा उत्साह व आवेश यांनी नजरुलना आद्वितीय बनविले असून त्यांचे चाहते व सामान्य जनता यांच्या दृष्टीने या गुणांमुळेच ते श्रेष्ठ ठरले आहेत.

स्वभावतः नजरुल हे जनतेचे कवी आहेत; आणि त्यांची स्वतःचीही अशीच धारणा आहे. आपल्या संपूर्ण साहित्यिक जीवनात ' कला ही जनतेसाठी आहे ' या सिद्धांतावर त्यांनी श्रद्धा ठेवली. अर्थात् लेनिनच्या या वचनाची बहुधा त्यांना माहिती नसावी. तरीपण त्यांनी अनेकदा असे ठामपणे सांगितले होते की, " मी काही फक्त उच्च वर्गाच्या लोकांसाठी लिहीत नसतो. " ज्याप्रकारे त्यांची जडणघडण झालेली होती ती लक्षात घेता आपल्या भोवतालची मानवी अवस्था व वस्तुनिष्ठ परिस्थिती यांनी त्यांचे अंतःकरण न हेलावणे शक्यच नव्हते. त्यांची निरागस कल्पनाशक्ती व अभिव्यक्ति-कौशल्य, त्यांचे भाषा-प्रभुत्व किंवा त्यांचा कोटीबाजपणा व कल्पकता यांनी क्वचित्प्रसंगी स्वैरसंचार केलाही असेल. आणि या गोष्टी त्यांच्या कलेला हानिकारकही ठरल्या असतील. परंतु त्यांची उत्स्फूर्ती व भावुक समर्पणवृत्ती यांमध्ये मात्र नेहमीच मनःपूर्वकता भरून राहिली असल्याचे दिसून येते. संगीतामध्ये त्यांना त्यांच्या धंदेवाईक मालकांसाठी कधी-कधी एका दिवसात १०–१५ गाणी तयार करून त्यांना चाली लावाव्या लागत. अशाप्रकारे आपल्या भयंकर अस्खलित वाग्वैभवाला व उधळेपणाला स्वतःच बळी पडणे त्यांना भाग पडे. खरे म्हणजे, त्यांच्या रचना विस्कळित, नीरस, कृत्रिम, प्रचारकी थाटाच्या होत; आणि पुष्कळदा त्या भव्योदात्त बनण्याऐवजी हास्यास्पद बनून जात. या साऱ्या गोष्टी म्हणजे खरोखरी एका प्रतिभावंतातील उणीवा होत्या; परंतु नजरुल यांच्यातील इतर काही गुणांनी या दोषांवरही मात केली. ते गुण म्हणजे त्यांच्या काव्यातील पौरुष, भावावेश व ओज यांची तीव्रता, शब्दकळेतील कल्पक योजकता, आपल्या सर्जनात्मक लिखाणामध्ये अरबी-फारसी व संस्कृत-बंगाली शब्दांचा यशस्वीपणे मधुर मिलाफ करण्याची त्यांची क्षमता वगैरे गोष्टी होत. त्यांच्या प्रेमाचे अनेक सूक्ष्म व तरल भावप्रकार आहेत. त्यात इंद्रियासक्त वैषयिक प्रेमापासून आध्यत्मिक प्रेमापर्यंतच्या अनेक छटांचा समावेश होतो. त्यांची कविता आपल्या देशामध्ये, येथील सामान्य माणसांमध्ये व हिंदू-मुस्लिम ऐक्यामध्ये भावनात्मकतेने गुंतलेली आहे. शिवाय मानवी स्वभावात जे काही सत्य व सुंदर आहे त्याचा, आंतर-राष्ट्रीय बंधुत्वभावनेचा आणि मानवी हक्कांचा ती सतत पाठपुरावा करीत आली आहे. या आणि अशाच इतर गोष्टींमुळे नजरुल हे बंगाली साहित्यात या महान् युगातील दुसऱ्या क्रमांकाचे कवी ठरले आहेत.

या ठिकाणी असा एक प्रश्न उपस्थित केला जाऊ शकेल की, " नजरुल यांच्या कृतींमध्ये काही ' उच्च प्रकारचे गांभीर्य खरोखरी आहे काय ? " नजरुल हे सर्वांत प्रथम ' विद्रोही कवी ' म्हणून पुढे आल्याने, हे उघड आहे की, ते केवळ बंडापर्यंतच थांबले नाहीत, याचा बहुतेक लोकांना विसर पडला. त्यांनी आपली बंडखोराची भूमिका कधीही नाकारली नाही, हे खरे; परंतु त्यांच्या व आपल्याही दुर्दैवाने काही दुःखपूर्ण व अनपेक्षित आपत्तींमुळे त्यांचे कलाजीवन मध्येच खंडित झाल्याने त्यांच्या जीवनाला अपेक्षित सर्वांगपरिपूर्णता प्राप्त होऊ शकली नाही. असे असूनही त्यांच्या जीवनामध्ये काही सखोल प्रेरणा होत्या; व त्या त्यांना अस्वस्थ करीत होत्या, असे दिसते. ज्या धुक्याने त्यांना गुरफटून टाकले आहे त्यातून ते बाहेर येऊ शकले तर कदाचित् जीवनाचा शोध घेण्याचे कार्य खऱ्या तेजाने झळाळून उठेल. या संदर्भात ' सिंधु-हिंडोल 'मधील कवितांचा आणि ' आमार सुंदर ' ( हे माझ्या सुंदरा ) कवितेतील श्रद्धेची अंतिम घोषणा (प्रतिज्ञापान) यांचा उल्लेख करणे उचित होईल.

' सिंधु-हिंडोल ' ( सागराचा हिंदोळा ) या संग्रहात काही असामान्य कविता आहेत. नजरुल यांच्या परिपक्व व उत्कृष्ट काव्याचा नमुना म्हणून त्या वैशिष्ट्यपूर्ण आहेत. या संग्रहातील ' सिंधु-हिंडोल ' या प्रमुख दीर्घ कवितेवरून त्याला ते नाव देण्यात आले आहे. त्यामध्ये ' अनामिका ' व ' दारिद्र्य ' या आणखी दोन महत्त्वपूर्ण कवितांचाही समावेश आहे. नजरुल यांनी आपले मित्र मुजफ्फर अहमद यांचे घर असलेल्या सनद्वीप या बेटाला भेट दिली होती. अर्थात् ते तेथे गेले त्यावेळी स्वतः मुजफ्फर अहमद मात्र मीरतच्या तुरुंगात कच्चे कैदी ( अंडरट्रायल ) म्हणून अडकून पडले होते. हे बेट बंगालच्या उपसागरात चितगावच्या किनाऱ्यापासून बरेच दूर आहे. तेथे आगबोटीने जावे लागते. ' सिंधु-हिंडोल ' ही कविता म्हणजे त्या छोट्याशा जलप्रवासाचे फळ आहे. कविता तीन भागांत असून पहिल्या भागात सागराला आवाहन करण्यात आले आहे. कवीच्या अंतःकरणातील भावावेश व दुःख, सौंदर्य व आनंद यांची उत्कट अभिलाषा आणि अज्ञानाविषयीची तीव्र उत्कंठा याच गोष्टी सागरामध्येही आहेत. दुसऱ्या भागात कवीने प्रेम ही काहीतरी महान् व उत्कृष्ट गोष्ट असल्याचे सांगितले आहे. तो स्वतःला विरही प्रियकर समजतो आणि सागराला विचारतो, " तूही तसाच आहेस काय ! " तिसऱ्या भागात समुद्र हा एक भव्योदात्त प्रेमिक या स्वरूपात आपल्यासमोर उभा राहातो. या प्रेमिकाने कसल्याही प्रतिफलाची आकांक्षा न बाळगता आपले सारे वैभव माणसाला व जगाला देऊन टाकले आहे. त्याच्या मोबदल्यात त्याला काहीच मिळत नाही. या ठिकाणी सागर हा एक प्रिय मित्र आहे. त्याला कवी प्रणाम करतो :

सुंदर आमार,
नमस्कार !

तुमि काँदो, आमि काँदि, काँदे मोर प्रिया अहोरह।

( हे माझ्या सुंदरा, नमस्कार. तू रडतोस, मी रडतो आणि माझी प्रियतमाही अहोरात्र रडते ).

यातील कल्पना फारशी स्पष्ट नाही, असे दिसेल. परंतु त्यामध्ये जीवन आणि प्रेम यांविषयीची एक जाणीव आहे; आणि त्या क्षेत्रातील अयशस्वी शोध त्यातुन व्यक्त होतो, यात मुळीच शंका नाही. या शोधाशी संबद्ध असलेले सौंदर्य हे अविभाज्य, अतूट आहे. 'सुंदर आमार' हे दोन्ही वैशिष्ट्यपूर्ण शब्द लक्षात ठेवण्यासारखे आहेत.

'अनामिका' या दुसऱ्या महत्त्वाच्या कवितेत प्रेम या सनातन कोड्याचे उत्तर शोधण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे. प्रेमपात्र अनेक असली तरी प्रेम हे एकच असल्याचे त्यात सिद्ध करण्यात आले आहे. त्या ठिकाणी प्रेम याचा अर्थ जीवनाचा प्रकाश असणारी वस्तू हा नसून केवळ शारीरिक प्रेम अथवा कामवासना याच अर्थाने प्रेम या शब्दाचा वापर करण्यात आला आहे, असे भाष्य करिता येईल. तथापि, नजरुल यांना मुक्त व उदात्त अनुराग अथवा भावावेग हा प्रेमाचा अर्थ अभिप्रेत आहे. 'दारिद्र्य' ही कविता अशासाठी महत्त्वाची आहे की ती नजरुल यांच्या जगाच्या वस्तुनिष्ठ व आत्मनिष्ठ बाजूंना जोडणारा एक दुवा आहे. 'दारिद्र्य हे मला माझा मार्ग सोडण्यास भाग पाडू शकणार नाही, 'सुंदर' दगा देणार नाही', असे कवी जाहीर करतो. याच्या उलट दारिद्र्य हे क्रांतीचे नेतृत्व करील आणि असत्य व असुंदर यांचा नाश करील असे ते सांगतात.

"याविषयी मुळीच शंका राहू नये,
सर्व दिशांतुन सौंदर्यकन्या तारुण्याच्या विजयाचे गीत गावोत,
असुंदर व असत्य यांचा धिःकार असो!
हे माझ्या सुंदरा, ये. हे प्रकाशा, तू उजळून नीघ!

या तीन कवितांमध्ये सौंदर्य हा जीवनाचा प्रमुख चिंता-विषय असून प्रेम ही त्याची प्रेरक शक्ती आहे. अशा प्रकारे वैयक्तिक पातळीवरून कवी हा जीवनाच्या शृंगापत्तीत सापडला असला तरी व्यक्तिनिरपेक्ष अशा मानवी पातळीवरून जीवनाच्या साफल्याविषयी त्याला पूर्ण खात्री आहे. कारण ज्या क्रांतीला त्याने वाहून घेतले आहे ती नक्कीच घडून येणार आहे; आणि तिच्याबरोबरच जगामध्ये सौंदर्य, आनंद व प्रकाश यांचे 'महान् युग' अवतरणार आहे.

आठ वर्षांनंतर 'आमार सुंदर' हे गद्यकाव्य अवतरले. या कालखंडातील दुःख व व्यथा यांनी त्यांच्यातील अस्वस्थ उत्कंठेचे रूपांतर निश्चित केलेल्या दृढसंकल्पात केलेले असते. जीवनाच्या साऱ्या उलथापालथींतून ज्या नियतीने

त्यांची जडणघडण केलेली असते त्या नियतीशी किंवा दैवी शक्तीशी दोन हात करण्याचा हा संकल्प असतो. ए. के. फझलुल हक यांनी पुनः सुरू केलेल्या 'नवयुग' दैनिकात काम करण्यासाठी नजरुल यांना पुनः बोलावण्यात आले. हे दैनिक हिंदू-मुस्लिम ऐक्याचा पुरस्कार करणार होते. नजरुल यांनी आपली भूमिका विशद करण्यासाठी त्या दैनिकाच्या १७ ज्येष्ठ १३४९ च्या (१९४२ च्या मे महिन्याच्या मध्यास) अंकात 'आमार सुंदर' हे गद्यकाव्य प्रकाशित केले. खरोखरी ती त्यांच्या श्रद्धेची ज्ञापना (कन्फेशन ऑफ फेथ) होती; आपल्या भूमिकेचे ते लिखित समर्थन – apologia pro vita sua – होते; आपल्या जीवनाचा शोध घेण्यासाठी त्यांनी केलेल्या धडपडीचा तो अहवाल होता; तसेच त्यांच्या 'जीवन देवते'चाही (टागोरांच्या 'Divinity of Life'चा) तो शोध होता. टागोरांच्या 'जीवन-देवता' या कवितांमध्ये जशी सुस्पष्टता व सुसंगती आढळते तशी नजरुलच्या या कवितेत आढळत नसली तरीही ती अलौकिक कलाकृती आहे; आणि त्याहून अधिक महत्त्वाची गोष्ट अशी की नजरुल यांना समजून घेण्याची ती गुरुकिल्ली आहे.

नजरुल सांगतात, 'माझा हा सुंदर प्रथम माझ्याकडे लघुकथेच्या रूपाने आला; आणि मग संगीत, सूर, लय, छंद, व कल्पना यांची रूपे त्याने घेतली." "नंतर या 'नवयुगा'त (१९२० साली) तो 'सामर्थ्य सुंदर' बनून आला. क्रांतीचा व बंडाचा संदेश घेऊन आलेला तो सुंदर भयंकर तेजःपुंज होता." त्यानंतर नजरुल यांच्या लोकप्रियतेचा व ब्रिटिश सरकारच्या तुरुंगात डांबले जाण्याचा कालखंड आला. "त्यावेळी मला असे कधी वाटले नाही की मी जे काही लिहितो ते माझे नसून वस्तुतः माझ्या 'प्रतिभा-सुंदर'चे आहे." त्यानंतर आठ वर्षेपर्यंत बंगालच्या खेड्यापाड्यांतून व लहानमोठ्या शहरांतून केलेल्या भटकंतीची कहाणी ते सांगतात. "नंतर मला असा शोध लागला की माझ्या मातृभूमीच्या रूपातच माझा 'प्रतिभा-सुंदर' आहे. मला असे सातत्याने जाणवू लागले की मी मानवावर प्रेम करण्यासाठीच जन्माला आलो आहे. जात-पात अथवा धर्म यांचा कसलाही विचार न करिता मी मानवावर प्रेम केले पाहिजे. त्यानंतर मला 'तरुण-सुंदर' व 'प्रेम-सुंदर' यांचा शोध लागला. मग 'प्रतिभा-सुंदर' हा मला 'शोक-सुंदर' दिसू लागला." त्यांचा मुलगा हे त्यांच्या दृष्टीने 'वात्सल्य-सुंदरा'चे सगुण रूप होते; आणि त्याच्या निधनाने त्यांचा आनंद, त्यांची कविता, त्यांचा हास्यविनोद आणि त्यांची गीते ही सारीच नाहीशी झाली. "असा होता माझा 'शोक-सुंदर'!"

आणि आपल्या शोकाकुल व बंडखोर मनःस्थितीत त्यांनी सवाल टाकला, "हा क्रूर स्रष्टा आहे तरी कोण! आणि त्याने तो 'बालक-सुंदर' का हिरावून घेतला! धिक्कार असो त्याचा. धिक्कार असो!" एका मित्राने सल्ला दिला, "ध्यान-धारणा कर. ध्यानातून 'प्रलय-सुंदरा'चे दर्शन घडलेच पाहिजे".

त्यांनी 'प्रलय-सुंदरा'च्या दर्शनासाठी अतोनात आक्रोश केला. त्यांनी कुराणाचे व वेदांताचे पठण केले. त्यांना असे सांगण्यात आले की, त्यांच्या जाणीव-पूर्व अवस्थेत त्यांच्या कवितेत व बंडात सौंदर्य मुखरित झाले होते. ते त्यांच्या बरोबर सदैव मित्र म्हणून राहिले होते. ते जागे झाले आणि त्यांनी आपला अभ्यास पुढे चालू केला. आकाश जणू दुभंगले; आणि " मला प्रथमच ' सुवर्ण प्रकाश सुंदरा'चे दर्शन घडले ".

आणि मग एका भयंकर ' शक्ती'ने त्यांना खाली खेचले " वेड्या माणसा ! " ती गरजली, " तुझ्या मातृभूमीचे ऋण फेडल्याशिवाय तू तिला सोडून कसा जाऊ शकतोस ? " म्हणून " मी पृथ्वीवर परत आलो. " आणि ज्या-ज्या वेळी कवीने निसटून जाण्याचा प्रयत्न केला त्या प्रत्येक वेळी त्याच्यावर अधिकाधिक जोरदार प्रहार करण्यात आले. त्यांच्या पत्नी घायाळ झाल्या. त्यांचा पैसा संपला. त्यांच्या-वरील कर्जाचा डोंगर असह्य झाला. अशावेळी एका अज्ञात मित्राने त्यांना अंतर्दृष्टी दिली. धुके नाहीसे झाले. " मी भूमातेचा प्रेमाने स्वीकार केला; आणि तिच्या गळ्याला मिठी मारली...आणि मला बंगालची व भारताची गरिबी व दुर्दशा दिसली. " आणि त्यांना तात्काळ गर्जना केली की, " जोपर्यंत मी माझ्या मातृभूमीला मुक्त करणार नाही तोपर्यंत मला देवही नको किंवा मोक्षही नको. "

अशाप्रकारे ते भूमातेकडे परत आले. उमलणाऱ्या व कोमेजणाऱ्या साध्या फुलांतही त्यांना 'पुष्प-सुंदरा'चे दर्शन झाले; आणि नदी, वारा, निळा समुद्र हे सारे त्यांचे बांधव बनले. आणि त्यांनीही त्यांचा जयजयकार केला. मग आले तुफान वादळ—काळोखाने भरलेले व भीषण ! त्याने निष्ठुरपणे जाहीर केले, " मीच तो प्रलय-सुंदर ! "

परिणामतः त्यांना त्यांची दृष्टी परत मिळाली; आणि त्यांना 'स्रष्टा-सुंदरा'चे दर्शन घडले. त्याने त्यांना पूर्णत्वाचे आश्वासन दिले. मात्र त्याने बजावले की, " तू प्रथम तुझे कर्तव्य पार पाडले पाहिजेस; आणि मानवाच्या जगाला त्याची मूळची शुचिता व सुंदरता पुनः मिळवून देण्यासाठी धडपड केली पाहिजेस. "

कवी या गद्यकाव्याचा शेवट ' आमीन ' ( तथास्तु ) या शब्दाने करतो.

अशाप्रकारे आपल्या आयुष्यातील वेगवेगळ्या टप्प्यांचे सविस्तर वर्णन नजरुल करतात. ध्यानाच्या माध्यमातून, आत्मनिष्ठ अमूर्त भाववादापासून मानवी दुरवस्थेच्या वस्तुनिष्ठ लक्ष्यांपर्यंत यात्रिकाने केलेल्या प्रगतीची कहाणी ते सांगतात; आणि शेवटी देशसेवा व मानवसेवा यांचे महत्त्व ते समजावतात. परंतु ते टप्पे फारसे सुस्पष्ट व आखीव-रेखीव नाहीत. आणि एका टप्प्यापासून दुसऱ्या टप्प्यापर्यंत जाण्याचा मार्ग, अल्प नकारापासून बहुमुखी होकारापर्यंतचा मार्ग, सहजा-सहजी कळण्यासारखा नाही. ध्यानयोगाच्या गढ मार्गाशी परिचित असणाऱ्यांनाच तो कळू

शकेल. तरीपण काही गोष्टी उघड आहेत; आणि त्यांच्या वैयक्तिक जीवनातील ज्या काही घटनांविषयी निश्चित निर्देश करण्यात आले आहेत त्याही स्पष्ट आहेत. त्यावरून आपल्या असे लक्षात येते की नजरुल यांच्या दृष्टीने जीवनाचा शोध हा सौंदर्याचा शोध होता. आणि शेवटी आपल्याला असे सांगण्यात आले आहे की जीवन आणि जग यांचा स्वीकार केल्यानेच या सर्वव्यापी 'सुंदरा'ला अत्यंत यशस्वीपणे पकडता येईल. म्हणून मातृभूमीच्या व मानवतेच्या ज्या सेवेसाठी नजरुल यांनी स्वतःला समर्पित केले होते त्या देशसेवेला व मानवसेवेलाच सर्वोच्च महत्त्व देण्यात आले आहे.

हे प्रतिज्ञापत्र केवळ सौंदर्याचे अथवा श्रद्धेचे नाही. ते एका मानवतावादाचे प्रतिज्ञापत्र आहे.

## संदर्भ-ग्रंथ-विषयक टीपा

नजरुल यांच्या प्रमुख कलाकृतींचा उल्लेख या पुस्तकात जागजागी करण्यात आला आहे. जेथे शक्य झाले तेथे त्यांच्या प्रथम प्रकाशनाच्या तारखाही दिल्या आहेत. मनोविकार जडून कवी मूक बनल्यापासून आतापर्यंत त्यांची आणखी काही गद्य-पद्य पुस्तके प्रकाशित झाली आहेत. परंतु त्यांच्या संपूर्ण साहित्याचे प्रकाशन अद्यापि झालेले नाही; आणि त्यांच्या सर्व रचना उपलब्धही होऊ शकत नाहीत.

या पुस्तकामध्ये नजरुल यांच्या लिखाणाच्या ज्या नोंदी करण्यात आल्या आहेत त्यांमध्ये पुढील उल्लेखनीय भर पडली आहे :–

**कविता** : संचयन ( संग्रह, १९५५ )
मरु-भास्कर ( १९५७ )
शेष सौगात ( १९४८ )

**गद्य** : नजरुल रचना संभार ( २ खंड. यामध्ये गद्याव्यतिरिक्त पूर्वी ... तो न झालेल्या पद्यांचाही समावेश आहे. )

**गीतसंग्रह** : बुलबुल ( भाग २, १९५२ )

मूळ पुस्तकात ज्यांची नोंद व्यवस्थितपणे घेण्यात आलेली नाही अशी पुस्तके :–

**कादंबऱ्या** : बाँधन-हारा ( १९२७ )
मृत्यु-क्षुधा ( १९३० )
कुहेलिका ( १९३१ )

**नाटके** : आलेया ( १९२५ )
मधुमाला ( १९५९ )
झिलिमिलि ( १९३० )

**काव्य** : ( मुलांसाठी ) :
झिंगे-फूल ( १९२६ )
सात-भाई चंपा ( १९२७ )

**अनुवाद** :
रुबाइयात-ए-हाफिज ( १९[illegible] )

काव्य-अंपर : ( काव्य-अंबरा; काव्यांबरा ! ) ( १९३३ )

रुबाइयात-इ-उमर खैयाम ( १९६० )

नजरुल यांच्या निवडक कवितांचा संग्रह तयार केला जात असून तो साहित्य अकादमी ( नवी दिल्ली ) तर्फे इंग्रजीत व प्रमुख भारतीय भाषांत प्रसिद्ध होणार आहे.

**परकीय भाषा :** नजरुल यांच्या निवडक कविता रशियन भाषेत व रशियातील काही इतर स्थानिक भाषांमध्ये प्रकाशित झाल्या आहेत. १९७० साली रशियन अनुवाद प्रसिद्ध झाला; आणि त्यानंतर इतर रूसी भाषांतील अनुवाद प्रकाशित झाले.

**हिंदी :** नजरुल यांच्या जीवनाची साहित्यिक या नात्याने संक्षिप्त माहिती व त्यांच्या काही ( नऊ ! ) महत्त्वाच्या कवितांचा अनुवाद वर्ध्याच्या राष्ट्रभाषा प्रचार समितीतर्फे प्रसिद्ध झाला होता. ( ही माहिती व कवितांची निवड गोपाल हालदार यांची ).

नजरुल यांची माहिती देणारी पुस्तके :–

**इंग्रजी :** १. वसुधा चक्रवर्ती – काजी नजरुल इस्लाम, नवी दिल्ली, १९६८.

२. काजी अब्दुल वदूद – क्रिएटिव्ह बेंगाल, कलकत्ता.

**मराठी :** श्रीपाद जोशी – ' काजी नजरुल इस्लाम ', आंतर भारती प्रकाशन, [illegible] एप्रिल १९५४, पृष्ठे ६०, मूल्य : बासष्ट पैसे.